


नोंदणी क्रं. एफ.१६०१४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

## निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**



मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास




नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ५३ । अंक ६ । **मार्च २०००**
माघ-फाल्गुन, शके १९२१
किंमत रु. २०/-
वार्षिक वर्गणी रु. २००/-



## *नवभारत*ची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* *नवभारत*, ऑक्टोबर, १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



**संपादक :**
वसंत पळशीकर

**साहाय्यक संपादक :**
अ.र. कुलकर्णी, एस्.डी. इनामदार,
अ.ना. ठाकूर

**संपादकीय पत्रव्यवहार :**
वसंत पळशीकर
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा).

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
श्री.ग. दीक्षित
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा)'



अनुक्रमणिका

# नवभारत

## अ नु क्र म



मुखपृष्ठ : सुजित पटवर्धन

# महाराष्ट्र शासनाचे इंग्रजीविषयीचे नवे धोरण : काही मुद्दे

**ऐतिहासिक-सामाजिक पार्श्वभूमी**

१. ब्रिटिशांनी भारतावर त्यांचे राज्य स्थापित केल्यामुळे राज्यकर्त्या वर्गाची भाषा म्हणूनच इंग्रजीचा येथे प्रवेश झाला. तत्पूर्वी, ती येथील कोणत्याही एतद्देशीय लोकसमूहाची भाषा नव्हती. येथीलच एक लोकसमूह प्रबळ होऊन सत्ताधारी बनला आणि त्याची भाषा अन्य भाषक समाजांनी स्वीकारली, असे झाले नाही. येथील **सर्व** विभिन्न भाषक समूहांवर ती लादली गेली.

२. इस्लाम धर्माचे अनुयायी असलेले विभिन्न वांशिक-भाषक-सांस्कृतिक लोकसमूहदेखील असेच बाहेरून येऊन येथे राज्यकर्ते बनले. त्यांपैकी मुघलांचे भारतावरील राज्य जवळपास सर्व देशभर पसरले आणि ते तुलनेने दीर्घकाळ राहिले. त्यांची (म्हणजे मुस्लिम राजघराण्याची) राज्ये होती तिथे दरबारात व अंशतः प्रशासनात अरबी, तुर्की, 'फारसी' वा तिचे एक ना एक रूप वापरात राहिले असे ढोबळपणे दिसते. पण प्रादेशिक भाषा पण वापरात राहिल्या. त्याहीपेक्षा पुढची गोष्ट म्हणजे, आपण जिला 'उर्दू' भाषा म्हणतो ती तिच्या विभिन्न प्रादेशिक बोली-भाषांमध्ये येथील भाषांशी आदान-प्रदान करीत विकसित झाली.

येथील बहुसंख्य मुसलमान हे धर्मांतरित आहेत. आणि त्यांची उर्दू ही येथेच जन्मलेली व विकास पावलेली भाषा आहे. तिच्या विभिन्न स्थानिक रूपांमध्ये उर्दू बोलणारे वेगवेगळ्या प्रदेशांमधील मुसलमान जास्तकरून सामान्यजनच राहिले. या कारणाने, उच्चभ्रू फारसी वा अरबी वा तुर्की इत्यादी भाषांमधून दरबारात वा राज्यकारभारात वा धर्मव्यवहारात काही प्रमाणात व्यवहार होत असेलही; तरी, त्या भाषांचे प्रभुत्व इंग्रजीसारखे प्रस्थापित झाले नाही. उर्दू ही 'राज्यकर्त्यांची भाषा' त्या अर्थाने बनली नाही.

३. ब्रिटिश राजवट ही परकीय राजवट असली तरी, गौरवर्णीयांची भारतात नेहमीच फार अल्प संख्या राहिली. त्यांनी राज्य केले व चालविले ते येथील लोकांमधून त्यांना निष्ठा वाहणारा, त्यांचा आदर्श डोळ्यांसमोर ठेवणारा एक राज्यकर्तावर्ग निर्माण करून. या नव्या राज्यकर्त्या वर्गात बव्हंशी सवर्णांमधील वरच्या वर्ण व जाती यांमधील मंडळी दाखल झाली. सत्ताधाऱ्यांची भाषा लोकभाषा नसावी, इंग्रजी भाषेमुळे लोक व आपण यात असणारे अंतर वाढावे व अधोरेखित व्हावे या गोष्टीला त्यांचा विरोध तर नव्हताच; वर्ण व जातपात यांवर आधारित विषम व्यवस्थेने त्यांचे मानस घडलेले असल्याने, त्यांच्यापैकी बहुतेकांनी ही वस्तुस्थिती 'यात गैर ते काय' या वृत्तीने स्वीकारली. किंबहुना, इंग्रजी भाषेच्या आधारे जी नव्या प्रकारची प्रतिष्ठा, सत्ता व मिळकत प्राप्त झाली ती त्यांना गोडच वाटली. इंग्रजीच्या आधारे जुन्या विषमतेवर आणखी एका विषमतेचे पूट चढून लाभ वाढला. त्यामुळे ही विभाजनरेषा टिकविण्यात स्वार्थी हितसंबंध निर्माण झाला.

४. मुळात, राज्यच त्या भाषकांचे प्रस्थापित झाले म्हटल्यावर, इंग्रजीचा स्वीकार करण्यावाचून गत्यंतर नव्हते. पण थोड्याच काळात, केवळ आंग्लभाषक गोऱ्या लोकांची नव्हे तर, जगभरच्या सुधारलेल्या सुसंस्कृत सभ्य माणसांच्या दृष्टीने श्रेष्ठ कोटीची व योग्य भाषा म्हणजे इंग्रजी; इंग्रजसाहेबा-सारखे जीवन जगणे हे नमुनेदार व उच्च संस्कृतीचे द्योतक, असा येथील नवे इंग्रजी शिक्षण घेतलेल्या बहुसंख्य शिक्षित भारतीयांनी मनोमन निवाडा केला वा पत्करला. इंग्रजांचे राज्य हे वरदान का, तर इंग्रजांच्या मुळे इंग्रजी भाषा, इंग्लिश समाजव्यवस्था व जीवनशैली, इंग्रजी भाषेमधून व्यक्त होणारे विचार, इंग्रजी साहित्य इत्यादी इत्यादी गोष्टींशी आपला परिचय झाला, आणि आपण मागास व असंस्कृत होतो ते त्या अवस्थेमधून बाहेर येऊ शकलो, म्हणून.

इंग्रजी भाषा, इंग्रजी चालचलणूक, रीतिभाती अवगत होणे, त्यांच्यावर चांगली पकड बसणे हे सत्ता-मिळकत-प्रतिष्ठा यांचा सोपान चढून जाण्याचे तर साधन होतेच; पण, आता ते सुधारलेले-पुढारलेले, सुसंस्कृत व सभ्य कोटीत प्रवेश करण्याचेही जवळपास एकमेव महाद्वार होय ही धारणा खोलवर नवशिक्षित मध्यमवर्गामध्ये रुजली.

हे मानस घेऊन महात्मा गांधी, पण बरीच वर्षे जगले.








हायस्कुलात शिकत असल्यापासून ते पुढे दक्षिण आफ्रिकेमध्ये बॅरिस्टर म्हणून प्रथितयश झाल्यावरही काही वर्षांपर्यंत. हा स्वानुभव, व इतरांचे मानसही, लक्षात घेऊनच *हिंद स्वराज्य* या पुस्तकात त्यांनी याचे वर्णन 'गुलाम मानस' असे केले.

५. ब्रिटिश राजवटीच्या काळात गोऱ्या पुरुषमंडळींच्या येथील स्त्रियांशी येत राहिलेल्या शरीरसंबंधामधून संकर प्रजा निर्माण झाली. हा 'अँग्लो-इंडियन' समाज. या स्त्रिया बव्हंशी तळच्या जातिजमातींमधील असत. या कारणाने या संकर प्रजेची सामाजिक-आर्थिक-शैक्षणिक स्थिती व दर्जा सामान्यतः कनिष्ठ राहिला. यांची स्वभाषा, म्हटले तर, 'देसी' इंग्रजी. पण या इंग्रजीला कधी राजमान्यताही मिळाली नाही ना समाजमान्यता.

हीच गोष्ट, तळातल्या ज्या जातिजमातींमधील लहानमोठ्या समूहांनी ख्रिश्चन धर्म स्वीकारून इंग्रजीला 'आपलेसे' केले त्यांच्या इंग्रजीची म्हणता येईल. या समूहांपैकी अनेकांनी, बहुधा बहुसंख्यकांनी त्यांची त्यांची मूळ भारतीय भाषाच राखली. पण इंग्रजी माध्यमाच्या शाळांच्या द्वारा यांच्यापैकीही अनेकानेकांची व्यवहार-भाषा कालांतराने इंग्रजी बनली. पण यांची इंग्रजीही 'स्थानिक बोली' या पातळीवरच स्वीकारली गेली, वा राहिली.

६. आणखीही एका प्रकारच्या इंग्रजी माध्यमाच्या शाळा भारतात जागोजाग स्थापन झाल्या. या शाळांमध्ये 'वाघिणीचे दूध' नामक इंग्रजी शिक्षण घेऊन नव्या मध्यमवर्गात जे दाखल झाले, भरभराटले व वर चढले त्यांची मुलेमुली अगदी लहान वयापासून इंग्रजी भाषेमध्ये शिकली. या शाळांमधून इंग्रजी भाषेतून सर्व विषय शिकविले जात एवढेच नाही; तर इंग्रजी चालचलणूक, रीतिरिवाज यांचे, आंग्ल संस्कृतीचे पाठ पद्धतशीरपणे दिले जात. पुष्कळदा या शाळांची वसतिगृहे असत, व वसतिगृहांचे एक उद्दिष्ट कातडी काळी-सावळी-गव्हाळ पण बाकी परिपूर्ण आंग्ल जंटलमन (व लेडी) घडविणे हे राहिले. लॉर्ड मेकॉले याचे स्वप्न साकार करणाऱ्या या शाळा होत्या. राज्य चालवायला लागणारी कारकून मंडळी तयार करणे हे लॉर्ड मेकॉलेचे उद्दिष्ट होते हा एक प्रस्थापित गैरसमज आहे. इंग्लिश संस्कृती व सभ्यता आत्मसात केलेला भारतीयांचा राज्यकर्ता वर्ग निर्माण करणे, आणि या राज्यकर्त्या वर्गाद्वारे भारताला नव्या प्रागतिक युगात घेऊन जाणे, हे त्याचे दूरगामी उद्दिष्ट होते. या शाळा व कॉलेजे यांमधून, इंग्रजी ही ज्यांची 'मातृभाषा' म्हणता येईल असा एक अभिजन वर्ग भारतभर निर्माण होत राहिला आहे. हा संख्येने अल्प असेल, पण सत्ता, संपत्ती, प्रतिष्ठा यांमध्ये सिंहाचा वाटा या समूहाकडे आला. तसा तो एकवटणे अटळ होते.

या प्रकारच्या शाळांमध्ये स्वतःचे शिक्षण झालेले नसतानाही स्वतःच्या बुद्धिमत्तेच्या, कर्तृत्वाच्या जोरावर या अभिजनवर्गात प्रविष्ट झालेलाही एक वर्ग आहे. इंग्रजी भाषेवर यांनी प्रभुत्व कमावल्यावरच व आंग्ल चालचलणूक व 'संस्कृती' तले काही घटक आत्मसात केल्यावरच त्यांना या अभिजनांमध्ये प्रवेश मिळतो. यांच्या मुलाबाळांची 'मातृभाषा' वरील प्रक्रियेद्वारा बऱ्याच अंशी इंग्रजी बनते व तेही आंग्लाळतात.

म्हणजे, इंग्रजी ही आमची मातृभाषा आहे, आणि आम्हीही तुमच्याएवढेच भारतीय आहोत; तेव्हा, इंग्रजी ही आता परकीय भाषा नसून तीही भारतीय भाषांपैकीच एक भाषा आहे, असे सार्थ म्हणू शकणारा एक द्वि- वा त्रिस्तरीय समाज भारतात आज अस्तित्वात आहे. आणि इंग्रजीला हा दर्जा देणे उचित, इष्ट व आवश्यक पण आहे. कारण ते वास्तव आहे.

७. पण येथे एक ग्यानबाची मेख आहे. एक तर, जनसामान्यांची जी इंग्रजी मातृभाषा आहे त्या 'देसी' इंग्रजीला भारतीय भाषा म्हणून मान्यता व दर्जा देण्याची ही गोष्ट नाही. ती कनिष्ठ दर्जाची, तुच्छ भावानेच वागविली जाणारी बोलीभाषा, नोकर-चाकरांची भाषा राहणार आहे.

आणि जी अभिजनांची मातृभाषा बनलेली इंग्रजी आहे तिला, 'तीही एक भारतीय भाषा' म्हणून मान्यता द्यावी व तिला स्थान द्यावे असे म्हटले जाते, तेव्हा ती अन्य भारतीय भाषांच्या बरोबरीने बैठकीवर बसत नाही. ती खुर्चीत ऐटीत व गुर्मीत बसते, आणि इतर भारतीय भाषा अदबीने, कमरेत वाकून तिला मुजरा करीत आसपास, आपले हीनत्व चेहऱ्यावर प्रकट करीत सतरंजीचा कोपरा पकडून बसतात.

या म्हणण्याचा पडताळा घ्यावयाचा असेल तर, स्वातंत्र्याच्या बावन्न वर्षांच्या काळात हिंदी भाषेला मिळालेली वागणूक डोळ्यांसमोर आणावी. भारतीय भाषांमध्ये सार्वजनिक-शासकीय व बिगर-शासकीय पातळ्यांवर, तसेच दरबारांत, कार्यालयांमध्ये, बाजारात आणि रस्त्यांवर व्यवहारात जास्तीत जास्त लोकांना समजण्यास सोपी भाषा हिंदी ही आहे. कारण मुळातच हिंदी मातृभाषा असणाऱ्या लोकांची संख्या मोठी आहे. भारतभर जो मुस्लिम समाज पसरलेला आहे तो जी भाषा बोलतो ती 'उर्दू' ही हिंदीच्या अगदी जवळची आहे. असे असूनही तिला








राष्ट्रभाषा/राजभाषा म्हणून स्वीकारण्याला विरोधच विरोध आहे. याचे एक कारण हेच आहे ना की, आपल्या बरोबरीच्या असलेल्या एका भाषेचे महत्त्व व स्थान, नाही म्हटले तरी, उंचावणार, वाढणार, ती वरचढ ठरणार, व मग हिंदीभाषकांच्या हाती अधिक संधी व सत्ता एकवटणार, ही दिसत असलेली संभाव्यता हे संकट वाटते.

या उलट, इंग्रजीला मिळत राहिलेली वागणूक आहे. तिला तीही एक भारतीय भाषा, असे स्थान दिले गेले – जे द्यायलाच हवे – तरी ते बरोबरीचे असणार नाही. एका इंग्रजीला, म्हटले तर, कारकुनीचे स्थान आहे आणि दुसऱ्या इंग्रजीला सत्ताधीशाचे.

८. भारताचा सामाजिक-आर्थिक-राजकीय-सांस्कृतिक/बौद्धिक व्यवहार, जन्मतः तशी नसली तरी, अभिजन-इंग्रजी जे स्वतःची मातृभाषा बनवू शकतील त्या अभिजनांच्या हाती एकवटलेला राहिला तर काय बिघडले?

किंबहुना, जर येणाऱ्या युगात भारताचा अभ्युदय व्हायचा असेल तर या अभिजन-इंग्रजीवर प्रभुत्व असणाऱ्या वर्गात वेगाने वाढ करावयास हवी, त्यांच्या हाती आवर्जून देशाची सूत्रे द्यावयास हवीत, तसेच त्यांच्या हाताखाली वेगवेगळ्या पातळ्यांवर बाबूगिरी-कारकुनी-प्यूनगिरी करणारी, त्या पातळीवरची इंग्रजी बोलू-लिहू-वाचू व वापरू शकणारी मोठी फौज निर्माण करावयास हवी, असे मोठ्या आग्रहाने प्रतिपादन केले जात आहे.

या उद्देशानेच, बहुधा, भारतभर इंग्रजी माध्यमाच्या शाळा उघडण्याची मोहीमच हाती घ्या, असा उपदेश परवा परवाच पुण्यास भरलेल्या सायन्स कॉंग्रेसमध्ये एका यशस्वी उद्योजक व्यक्तीने केला.

लॉर्ड मेकॉले अभिजन-इंग्रजी जाणणाऱ्या, सर्वार्थाने आंग्ल बनलेल्या सत्ताधारी नेटिव वर्गाच्या निर्मितीची गोष्ट करीत होता. या सत्ताधारी वर्गापलीकडे असलेल्या विभिन्न भाषक भारतीय समाजांचे भविष्यात चित्र काय राहणार हे त्याने त्याच्या लेखनातून बहुधा कोठे तपशिलाने मांडलेले नसावे. आज आम्ही ते चित्र एका प्रकारे पूर्ण करू पाहत आहोत, असे म्हणता येईल.

**महाराष्ट्र शासनाचे नवे धोरण**

९. पहिलीपासून 'हसत-खेळत' इंग्रजीचे शिक्षण महाराष्ट्रभरच्या सर्व शाळांमधून येत्या जूनपासून सुरू करण्याचा निर्णय महाराष्ट्र शासनाचे शिक्षणमंत्री प्रा. रामकृष्ण मोरे यांनी जाहीर केला. या निर्णयावरची शाई वाळत नाही तो पुणे महानगरपालिकेने इंग्रजी माध्यमाच्या शाळा सुरू करणार असल्याचे जाहीर केले आहे.

बहुजनांचे, विशेषेकरून कनिष्ठ गणल्या गेलेल्या जातिजमातींमधील – महात्मा फुले यांच्या भाषेतील 'शूद्रातिशूद्र'- उगवत्या पिढींचे, तसेच शहरी उच्च व उच्च मध्यमवर्गीयांच्या विरोधात ग्रामीण मुलामुलींचे हित डोळ्यांसमोर ठेवून हा निर्णय घेतला गेल्याचे सांगितले गेले आहे. *साधना* साप्ताहिकामध्ये (वर्ष ५२, अंक २३; १५ जानेवारी २०००) नामदार प्रा. मोरे यांची मुलाखत प्रसिद्ध झाली आहे. त्यात ते म्हणतात, "बहुजन समाजातील मुलामुलींना इयत्ता पाचवीपासून म्हणजे वयाच्या दहा वर्षानंतर इंग्रजीची सुरुवात होते व त्यामुळे पुढे त्यांच्या मनात या विषयाची सदैव दहशत राहते, असा माझा अनुभव आहे.... ही दहशत प्रथम घालविली पाहिजे. हसत-खेळत इंग्रजी जर वयाच्या पाचव्या-सहाव्या वर्षापासून त्यांना शिकविली तर त्यांची इंग्रजीशी दोस्ती होईल आणि ते भविष्यात इंग्रजीवर उत्तम प्रभुत्व संपादन करू शकतील असा मला विश्वास वाटतो." पुढे एका प्रश्नाच्या उत्तरात ते म्हणतात, "ज्या वयात मुलांची वाढ होते, आकलनशक्ती वेगाने आकार घेते त्या काळातच (वय वर्षे ५ ते ८) जर इंग्रजी एक 'विषय' म्हणून त्यांच्यापुढे आली तर त्यांची भाषक कुचंबणाही होणार नाही आणि निर्दोषपणे, निकोपपणे त्यांची इंग्रजीशी मात्र दोस्ती होईल. इंग्रजीचा बाऊ करू नये, तिचे प्रस्थ माजवू नये तसेच तिचा द्वेष करूनही उपयोगी नाही. आज आपण मुक्त अर्थव्यवस्था स्वीकारल्यानंतर २१ व्या शतकात आणि तिसऱ्या सहस्रकात जाताना तिला पूरक अशी इंग्रजीची दोस्ती आपल्याला समृद्ध करणारी ठरेल, असा माझा विश्वास आहे..... इंग्रजी ही आंतरराष्ट्रीय भाषा आहे. प्रगत तंत्रज्ञानाच्या देवाणघेवाणीमध्ये इंग्रजी महत्त्वाची आहे."

ते पुढे म्हणतात, "इंग्रजीचे अध्ययन पाचवीपासून सुरू केल्यास उशिरा सुरुवात होते व विद्यार्थ्यांचा इंग्रजी विषय कच्चा राहतो. आजच्या स्पर्धात्मक युगात मराठी मुले मागे पडण्याची जी अनेक कारणे आहेत त्यांतील एकमेव नसले तरी महत्त्वाचे एक कारण इंग्रजीची भीती हे आहे. मातृभाषेचा दुरभिमान बाळगून भावनिक गोष्टीला बळी पडून इंग्रजीला अव्हेरणे चूक होईल असे मला वाटते. इंग्रजीची भीती दहशतीत

अनुक्रमणिका

बदलते आणि बहुजनांची कत्तल होते. ती थांबविण्याची गरज आहे."

नामदार मंत्रिमहोदयांना त्यांच्या नव्या निर्णयाच्या अंमल-बजावणीमुळे जे जे घडेल अशी खात्री आहे ते ते सर्व घडून येण्याची शक्यता कितपत, याचाच आपणांस विचार करावयाचा आहे.

१०. प्रा. मोरे यांच्या म्हणण्यात वस्तुस्थितिनिदर्शक असा काही भाग आहे त्याची प्रथम नोंद करूया.

त्या त्या काळात जगाच्या एकेका भागात एखादी भाषा वेगवेगळ्या कारणांनी प्रगत बनते, वरचढ ठरते, आंतरराष्ट्रीय दळणवळणाची भाषा बनते. आज वेगवेगळ्या कारणांनी इंग्रजीस जागतिक व्यवहारांमध्ये विशेष स्थान आहे. त्या भाषेमध्ये व्यवहार करता आल्यास ते लाभदायी ठरणार आहे यात काही शंका नाही. उत्तम इंग्रजी जाणणारी व इंग्रजीत आवश्यक ते व्यवहार करणारी माणसे पर्याप्त संख्येने असणे आवश्यक आहे याबद्दल दुमत व्हायचे कारण नाही.

इंग्रजीची भीती, तसेच इंग्रजीची दहशत ही पण वस्तुस्थिती आहे. मात्र या दोन गोष्टी वेगळ्या आहेत. इंग्रजीची भीती का वाटते? याची दोन कारणे दिसतात. शाळेत इंग्रजी हा विषय ५वी पासून पुढे सक्तीचा असूनही, आणि औपचारिकतः तो शिकविला जात असूनही, हा विषय आपला अगदी कच्चा राहिला आहे, हे विद्यार्थ्यांना मनोमन माहीत असते. याच्या भरीला मुले मग, 'आपल्याला इंग्रजी कधीच येणार नाही,' असे मनोमन ठरवून टाकतात. आणि मग इंग्रजीची भीती मनात घर करते. कारण, तो विषय सक्तीचा असल्याने, त्या विषयात परीक्षा देण्यातून सुटकाच नसते. अशी भीती मुलांना गणित या विषयाची पण असल्याचे अनुभवाला येते. विज्ञान विषयाबाबतही ही स्थिती बऱ्यापैकी असते. भीती नसते 'मराठी' व 'सामाजिक अभ्यास' (इतिहास, भूगोल आदि) या विषयांची. हे विषय स्वतःचे कच्चे राहिले तरी भीती नसते.

दहशतीचा मामला वेगळा आहे. दहशत माणसाला कोणाची का व कधी वाटते, असा प्रश्न विचारूया. सत्तेच्या (आर्थिक, राजकीय, पाशवी वा बौद्धिक/सांस्कृतिक/धार्मिक सत्तेच्या) जोरावर जो जुलूम करू शकतो, नुकसान करू शकतो, वाट अडवू शकतो, हवे तसे नमवू शकतो अशा माणसाची दहशत असते. इंग्रजी भाषेची, ती भाषा बोलणाऱ्या, वापरणाऱ्या लोकांची, इंग्रजीसोबत येणाऱ्या साहेबी चालचलणूक, वेशभूषा व जीवनशैली यांत वावरणाऱ्या लोकांची दादागिरी भारतात सर्वदूर प्रस्थापित झालेली आहे. आपले इंग्रजी कमालीचे कच्चे आहे, इंग्रजीत चार शब्द बोलायचे म्हटले तर आपल्याला जमत नाही, इंग्रजीत काही वाचून, समजून घ्यायचे तर अडते हा अनुभव ज्याला स्वतःसंबंधी येतो त्याला दहशत वाटणारच.

तेव्हा, ज्यांना ज्यांना त्यांच्या उपजीविका संपादण्यासाठी, जीवनव्यवहारांसाठी जेव्हा जेव्हा ज्या ज्या पातळीवरील इंग्रजीचा वापर करण्याची गरज पडते तेव्हा तेव्हा इंग्रजीतून समर्थपणे व्यवहार करता येईल इतके त्यांना इंग्रजी चांगले येईल असे घडले तर ते निश्चितच हवे आहे.

इंग्रजी ना, आपल्याला येत नाही व कधीच येणार नाही, या प्रकारच्या भीतीपासून इंग्रजी शिकणाऱ्यांची मुक्तता व्हायलाच हवी. सर्वसाधारण बुद्धी असलेल्या कोणालाही इंग्रजी बऱ्यापैकी येऊ शकते; आपल्यालाही ती शिकण्यात, तिचा सक्षमतेने वापर करण्यात अडचण काही नाही, असा विश्वास मुलांच्या ठायी उत्पन्न करता आला तर हवेच आहे.

दहशतीचा मामला पुन्हा थोडा वेगळाच आहे. म्हणजे असे की, इंग्रजीची, व पर्यायाने इंग्रजी भाषा, साहेबी चालचलणूक इत्यादींच्या आधारे दादागिरी करणाऱ्या एका अत्यल्पसंख्यक थराची दहशत संपुष्टात यावी अशी एक भूमिका घेता येते. समाजव्यवस्था अशी असावी की, कोणाचीच कोणावर दहशत प्रस्थापित होणार नाही; म्हणजेच समता व न्याय या तत्त्वांवर सर्वच व्यवहारांची पुनर्रचना करण्याचा तो भाग बनतो. तर समाजात कोणाची ना कोणाची दहशत चालणारच, फक्त दादागिरी करणाऱ्या अतिउच्चभ्रू समाजघटकाचा आपण भाग असावे, दादागिरीचे लाभ आपणांस मिळावेत, अशीही भूमिका घेता येते.

इंग्रजीची दहशत मोडून काढावयाच्या ऐवजी, स्वतःच्या मुलांना इंग्रजी माध्यमाच्या शाळांमध्ये, विशेषतः कीर्तिमान इंग्रजी माध्यमाच्या कॉन्व्हेंट शाळांमध्ये, घालून आपल्या मुलांना दहशत बसविणाऱ्या वर्गामध्ये प्रविष्ट करण्याची धडपड पालक करीत असल्याचे चित्र आपल्याला दिसत आहे.

११. मराठी मातृभाषक मुलांचे शालेय शिक्षण (१०वी पर्यंत) मराठी माध्यमामधूनच व्हावे हीच आपली भूमिका आहे असे प्रा. मोरे यांनी म्हटले आहे. म्हणजे, विचार करावयाचा मुख्य मुद्दा, वर स्पष्ट केलेली उद्दिष्टे पार पाडण्याच्या दृष्टीने, इंग्रजी शिकविण्याची कोणती व्यवस्था श्रेयस्कर ठरेल, हाच राहतो.

यातही, आज महाराष्ट्रातल्या सर्व शाळांमध्ये ५वी ते १०वी एक विषय म्हणून इंग्रजी शिकविले जातेच. पण ते पुरे पडत नाही, असे प्रा. मोरे यांचे म्हणणे आहे. ते पुरे न पडण्याचे एक कारण, त्यांच्या मते, भाषा नैसर्गिकरीत्या सहजपणे आत्मसात करण्याची क्षमता ज्या वयात मुलांची सगळ्यात चांगली असते त्या वयात ती शिकविली जात नाही हे आहे. हे कारण इतर सर्व कारणांपेक्षा अधिक महत्त्वाचे, निर्णायक महत्त्वाचे आहे असे त्यांचे म्हणणे दिसते.

१२. महाराष्ट्रात आजही लोक ज्या अनेक भिन्न बोली-भाषांमध्ये आपले आपापसातले जीवनव्यवहार करतात त्या बोलीभाषा आणि मुलांचे प्राथमिक शिक्षण यांचा योग्य संबंध कोणता, हा प्रश्न आपण तूर्त बाजूला ठेवूया.

नैसर्गिकरीत्या मुले शाळेबाहेर मराठी ग्रहण करतात. प्रा. मोरे यांच्या योजनेनुसार आता मुले शाळेमध्ये 'नैसर्गिकरीत्या हसत-खेळत' इंग्रजीचे धडे घेतील. तरीही शाळेबाहेर जशी मराठी त्यांच्या अवतीभवती सतत असते तशी इंग्रजी कधीच असणार नाही; आणि शाळेतही, इंग्रजीसाठी ठेवलेल्या तासिका सोडल्या तर, शिक्षक, शिक्षकेतर कर्मचारी, मुलेमुली इंग्रजी भाषा बोलताना मुलांच्या कानांवर पडेल असे होणार नाही. जो खरा बहुजनसमाज आहे त्यातील मुलांची ही स्थिती कायम राहील. या उलट आंग्लाळलेल्या उच्चभ्रू थरांतील कुटुंबांमधील मुलांच्या बाबतीत, शाळेबाहेर त्यांच्या परिसरात इंग्रजी बोलली जाताना त्यांच्या कानांवर पडेल, घरातही काही परिचय 'हसत-खेळत' होईल. (दूरदर्शनच्या, संगणकाच्या मार्फत होईल.) ती ज्या शाळांमध्ये जातात तिथेही मुलांच्या कानांवर विशिष्ट तासिकांच्या बाहेर इंग्रजी पडेल. इंग्रजी बोलण्याचेही प्रसंग घरात, घराबाहेर व शाळेत या मुलांच्या बाबतीत जास्त येतील. हा जो फरक पडणार त्यामुळे, एक विषय म्हणून इंग्रजी पहिलीपासून प्रविष्ट केल्यानंतरही, असंख्य मुलांच्या बाबतीत त्यांचे इंग्रजीचे शिक्षण हसत-खेळत, नैसर्गिकरीत्या होईल याची शक्यता नाही. ते तसे होण्यासाठी प्रा. मोरे यांना पुढील फतवा काढावा लागेल : शाळेच्या आवारात व घरीदारी फक्त इंग्रजीतच संभाषण करण्यास परवानगी आहे. मग, सगळेच विषय इंग्रजीमधून शिकवावेत, हे फक्त एक पुढचे पाऊल असेल.

याचा अर्थ व परिणाम काय होईल? याचा अर्थ असा की, 'नैसर्गिकरीत्या हसत-खेळत' इंग्रजीचे शिक्षण होण्यासाठी शाळेत काही तासिकांची व्यवस्था करणे पुरेसे नाही. आनुषंगिक इतरही बऱ्याच गोष्टी जोडून असाव्या, याव्या लागतात. त्या कृत्रिमरीत्याच प्रस्थापित कराव्या लागतील, अशीच महाराष्ट्रा-तल्या ९०-९५ टक्के शाळांच्या बाबतीत आज स्थिती आहे. आता, ह्या जर कृत्रिमरीत्या प्रस्थापित करायला लागल्या तर, इंग्रजीचे शिक्षण नैसर्गिकरीत्या होत आहे असे म्हणता येणार नाही. परिणाम काय होईल? इंग्रजीची भीती कमी होणार नाही, व दहशतही दूर होणार नाही. मुलांचा गोंधळ वाढेल.

या नव्या धोरणाचा आणखी एक परिणाम अटळ दिसतो. इंग्रजी माध्यमाच्या शाळा सर्वत्र कुत्र्यांच्या छत्र्यांप्रमाणे उगवून येतील, ज्या शाळांमध्ये ना विषयांचे शिक्षण धड होईल ना इंग्रजीचे. आजच अनेक इंग्रजी माध्यमांच्या शाळांच्या बाबतीत ही स्थिती आहे. नगरपालिका/महानगरपालिका, जिल्हा परिषदा, अनेक खाजगी संस्था या मराठी माध्यमाच्या शाळाही नीटपणे चालवू शकत नाहीत; इंग्रजी माध्यमाच्या दर्जेदार शाळा त्या चालवू शकतील ही शक्यता जवळपास नाही.

माणसाच्या माणूसपणाची आणि समाजाच्या समाजपणाची व संस्कृतीची पाळेमुळे भाषेत खोलवर रुजलेली असायला लागतात; एरवी त्याचे माणूसपण, सुसंस्कृतपण, समाज व संस्कृती यांची धारणा याच धोक्यात येतात. जिच्यात पाळेमुळे रुजवणे शक्य आहे, अशी कोणती भाषाच धड त्यांची नाही अशी मुलांची गत होऊन जाईल.

१३. आता, शाळेत, वर्गात 'हसत-खेळत' इंग्रजीचे शिक्षण देण्याच्या गोष्टीकडे वळू. 'हसत-खेळत' विषय शिकण्याचे एक बाल वय जरूर असते. नंतर वय येते जेव्हा मुलांनी स्वतःला कसावे, शिक्षकांनीही त्यांना विषय शिस्तीने, परिश्रम-पूर्वक शिकावा लागतो याचे भान आणून द्यावे व आग्रह धरावा, याची गरज असते. आता, 'हसत-खेळत' शिकण्याच्या वयात सर्वच विषय त्या पद्धतीने शिकायला, शिकवले जायला हवेत. केवळ इंग्रजी विषय तेवढा नाही. याचे भान प्रा. मोरे यांच्या मुलाखतीमध्ये आढळत नाही ही दुर्दैवाची गोष्ट आहे. हे भान असले तर प्राथमिक शिक्षणाची घडी साऱ्याच विषयांच्या शिक्षणासाठी बदलायला हवी हे त्यांच्या लक्षात येईल. त्याच-बरोबर, ती तशी बदलण्यासाठी मंत्रालयापासून थेट तालुका/शहर शिक्षणाधिकारी यांच्यापर्यंतच्या नोकरशाहीची चालचलणूक बदलावी लागेल, शिक्षणखात्याची संरचना बदलावी लागेल ही गोष्टही लक्षात येईल.

पाठ्यपुस्तकातले धडे करवून घेतले नाहीत, गोष्टी घटवून घेतल्या नाहीत, गृहपाठ दिला नाही, परीक्षा घेतल्या नाहीत म्हणजे हसत-खेळत शिक्षण होते अशी तर समजूत झालेली नाही? मध्यप्रदेशात व राजस्थानमध्ये सुविख्यात प्रयोगशील शैक्षणिक संस्थांचे काम पाहावयास गेलो असताना माहीत पडलेली गोष्ट अशी की, परीक्षा घ्यावयाच्या नाहीत याचा प्रत्यक्षातला अर्थ शिकवायचीच फारशी गरज नाही, असा केला गेलेला आहे. त्यामुळे दरवर्षी परीक्षा घ्या, असा पालकांचा आग्रह वाढत आहे.

तात्पर्य, 'हसत-खेळत' ही पद्धती राबविण्यासाठी पण शिक्षण सकस घडण्यासाठी कळीचे महत्त्व असलेला घटक शिक्षक हा आहे. शिक्षक नुसता वर्गात उभा आहे व तासिकेचा पूर्ण वेळ शिकवतोय एवढे पुरत नाही. प्राथमिक स्तरावर आज असंख्य शाळांमध्ये या दोन गोष्टीही घडत नाहीत, आणि त्याही घडणे महत्त्वाचे ठरत आहे, ही गोष्ट वेगळी. पण शिक्षकाजवळ उच्च दर्जाची विषयाची जाण, शिकवण्याची क्षमता, आवश्यक ती विविध कौशल्ये व तंत्रे (उदा. गाणी म्हणणे, गोष्टी सांगणे, हावभावांसह अभिनय करणे, खेळ घेणे इत्यादी) यांच्यावर पकड या गोष्टी हव्यात. हसत-खेळत पद्धतीने मुलांचे शिक्षण उत्तम होण्यासाठी या सर्वापेक्षा अधिक महत्त्व आहे ते पुढील दोन गोष्टींना : शिक्षकाला लहान वयाच्या मुलांच्या बरोबर शिकविण्याचे काम करण्याची गोडी असायला हवी. त्याला मुले आवडायला हवीत, त्यांच्याशी 'संवाद' करण्यास आनंद वाटायला हवा. आणि शिकविण्याची कळकळ व प्रेरणा हवी.

इंग्रजीच नव्हे तर, सर्वच विषयांचे 'हसत-खेळत' शिक्षण उत्तमरीत्या फक्त शहरांमध्ये, आणि तेही अभिजन वर्गांच्या मुलांचे व त्यांच्यासाठीच्या शाळांमध्ये, होऊ शकते, असा हा युक्तिवाद नाही. शिक्षक प्रेरित असेल, शिकविण्याची त्याला गोडी असेल, मुले त्याला आवडत असतील, कळकळ असेल, व विषयाची चांगली समज असेल, तर कनिष्ठतम सामाजिक-आर्थिक जातिजमाती, थर यांमधील, दुर्गम अंतर्भागातील मुलांचेही या पद्धतीने उत्तम शिक्षण होते. सुदैवाने, असे जातिवंत, हाडाचे शिक्षक आढळतात, भाग्यवान मुलांच्या वाट्याला येतात.

'हसत-खेळत' पद्धतीने विषय शिकविण्याची आकांक्षाच सोडा, असेही आमचे म्हणणे नाही. पहिली चारसहा वर्षे (बालवाडी ते ४थी) सर्व मुलांचे सर्वच शिक्षण या पद्धतीने वास्तविक व्हायला हवे. फक्त इंग्रजीची गोष्ट करू नका. आणि असा एकच विषय अशा पद्धतीने शिकविण्याची गोष्ट होणारही नाही.

आमचे पुढचे म्हणणे असे की, मराठी, गणित, विज्ञान, परिसर/सामाजिक अभ्यास हे जे विषय आज प्राथमिक शाळांमध्ये शिकविले जात आहेत, व जे मराठीतून शिकवले जात आहेत, त्यांचे सकस शिक्षण हसत-खेळत देण्याची क्षमता व प्रेरणा शिक्षकांच्या व शिक्षण-व्यवस्थेच्या ठायी प्रथम निर्माण करण्यास अग्रक्रम द्या. त्याची नितांत गरज आहे. केवळ खेड्यापाड्यांमध्ये नाही, सर्वत्रच.

१४. पहिलीपासून इंग्रजी विषय सक्तीचा करून इंग्रजीच्या सकस शिक्षणाची पायाभरणी करण्याचे आव्हान पेलण्याची ताकद आपल्या शिक्षणव्यवस्थेतील कोणत्याही घटकाजवळ नाही. आमचे म्हणणे असे की, ५वी ते १०वी या काळात आज इंग्रजी विषय आहेच, तर प्रथमतः या टप्प्यावर होणाऱ्या इंग्रजी शिक्षणाची गुणवत्ता व सार्थकता वाढविणे, हे आव्हान स्वीकारणे विवेकाला व शहाणपणाला धरून होईल.

इंग्रजी विषय शिकविण्याच्या क्षेत्रामधील आपण तज्ज्ञ आहोत असा दावा करणाऱ्या महाराष्ट्राच्या विभिन्न भागांमधील झाडून सर्व व्यक्तींना, व्यक्तिगत व सामूहिकरीत्या, ५वी ते १०वी या टप्प्यात इंग्रजीच्या शिक्षणाचे आव्हान यशस्वीपणे पेलण्यासाठी फार मोठी कल्पकता, अभिक्रमशीलता, आणि फार मोठे कर्तृत्व प्रकट करावे लागेल, कंबर कसून परिश्रम करावे लागतील एवढे हे आकाराने व खोलीने मोठे आव्हान आहे.

याला ११वी व १२वी पण जोडून घेऊन विचार करता येईल; कारण प्राथमिक शिक्षक १२वी झालेले असतात. म्हणजे, समजा, ५वी ते १२वी या दोन टप्प्यांमधल्या इंग्रजी शिक्षणाचा दर्जा सुधारल्यावरही, पहिलीपासून इंग्रजी सुरू करायला हवे असा निवाडा झाला तर, हा निर्णय राबविण्यासाठी उपयोगी असे शिक्षक अनेक पटींनी जास्त उपलब्ध असतील.

५वी ते १२वी या टप्प्यांमधील इंग्रजीच्या शिक्षणाचा दर्जा सुधारण्याचे काम प्रथमतः व अग्रक्रमाने करावे ही गोष्ट शहाणपणाची का ते आधी पाहू. भारतात आजच्या घडीला १ली ते ४थी या टप्प्यावर गळतीचे प्रमाण ४० टक्के एवढे मोठे आहे. या गळणाऱ्या मुलांना ४ वर्षांच्या काळात इंग्रजी कोणत्याही पद्धतीने शिकवले तरी ते वाया जाणार. ही गळती इंग्रजीमुळे होत नाही. ती न होण्यासाठीचे उपाय अग्रक्रमाने






प्रथम अंमलात आणावेत. ५वी ते १०वीत जी गळती होते त्याचे एक कारण जर इंग्रजीची भीती हे असेल तर, ते ज्या प्रमाणात आहे त्या प्रमाणात, इंग्रजीचा दर्जा सुधारण्यामुळे गळती थांबायला मदत होईल. म्हणजे, यासाठीचा खर्च व परिश्रम कारणी लागतील. दुसरी गोष्ट, इंग्रजी शिक्षणाचा दर्जा सुधारण्यासाठी मुख्यतः शिक्षकांची गुणवत्ता, क्षमता व कौशल्य वाढविण्याची नितांत गरज आहे. कळीचा, निर्णायक घटक तोच आहे. शिक्षकांची संख्या सापेक्षतः कमी असेल, आणि त्यामुळे काम आवाक्यातले राहील. तिसरी गोष्ट अशी की, बौद्धिक व अन्य व्यवहारांची भाषा म्हणूनच भारतात इंग्रजीचा प्रमुख उपयोग असल्याने, योग्य पाठ्यपुस्तकांच्या साहाय्याने इंग्रजी भाषा शिकविण्याचे प्रशिक्षण शिक्षकांना देण्याची व्यवस्था, तुलनेने, जास्त आवाक्यातली आहे. अगदी लहान वयाच्या मुलांना मर्यादित तासिकांच्या चौकटीत हसत-खेळत पण ठोस शिक्षण द्यावयाचे ही केवळ तंत्रे शिकून घेण्याची गोष्ट नसते; ती एक कला असते. आणि म्हणून तिचे प्रशिक्षण देणे ही महादुर्घट गोष्ट आहे. हे काम आठ-दहा दिवसांचे 'प्रशिक्षण वर्ग' आयोजित करून साधता येईल हा प्रा. मोरे यांनी दाखविलेला विश्वास पोकळ व फाजील आहे असे मोठ्या खेदाने म्हणावे लागते. शिवाय, ज्यांचा त्यांनी तज्ज्ञ म्हणून उल्लेख केला आहे त्यांच्यापैकी हसत-खेळत इंग्रजी उत्तम शिकविण्याचे कार्य पार पाडलेल्या व ज्या स्वतः मराठी भाषक असून प्रशिक्षण देऊ शकतील अशा व्यक्ती महाराष्ट्रात आज पन्नास-साठ तरी निघतील का, याची शंका आहे. तुलनेने, ५वी ते १२वी या टप्प्यांवर शिक्षकांचे प्रशिक्षण करू शकतील असे अनुभवी, चांगले शिक्षक पुष्कळ जास्त उपलब्ध होतील.

येथेही दोनतीन सावधानतेचे इशारे देणे आवश्यक आहे : (१) जे चांगले अनुभवी शिक्षक असतात त्यांना 'जातजमात' व 'प्रदेश' नसतो याचा आग्रह धरून, खरोखर गुणवत्ता हाच निकष मानला पाहिजे. हे इतके सोपे नाही! (२) शिक्षणक्षेत्रात अमुक इतकी वर्षे काढली, वा इतके लेख लिहिले वा व्याख्याने दिली, यामुळे कोणी 'तज्ज्ञ' व 'प्रशिक्षक' या पदाला लायक बनत नाही, याचे फारच पक्के भान असायला हवे. प्रशिक्षणाची कामगिरी ही एकेका प्रदेशासाठी एका गटाने घ्यावी, आणि ती पार पाडल्याची त्यांना 'अग्निपरीक्षा' द्यावी लागावी अशी व्यवस्था असायला हवी. एरवी त्यांच्यावर व प्रशिक्षणावर झालेला खर्च दंडासहित वसूल करण्याची तरतूद असावी. अशी योजना करून तज्ज्ञ-प्रशिक्षकांचे किती गट पुढे येतात ही गोष्ट पाहण्यासारखी आहे.

१५. आता जरा विवेकाच्या अंगाने विचार करू. भारतीय भाषा उच्च कोटीचे साहित्य निर्माण केलेल्या भाषा आहेत, आणि अनेक शतकांचे त्यांचे वय आहे. एकेका भाषक समूहाची लोकसंख्या अनेक कोटी इतकी मोठी आहे. विज्ञान-तंत्र-विज्ञानाच्या, दळणवळणाची माध्यमे व तंत्रे, व्यापार-उद्योग व अन्य क्षेत्रांच्या बाबतीत जग कितीही पुढे गेले असले तरी, स्वतःच्या भाषा टाकून देऊन इंग्रजीचा आश्रय घेण्याची गरज नाही हे जाणणे हा विवेकी भूमिकेचा पहिला भाग आहे. आत्मविश्वास, निर्धार व परिश्रम जर आपण कामी लावले तर एका पिढीच्या अवधीत इंग्रजीची मिरासदारी व दहशत आपण निर्मूल करू शकतो, व हे काम करावयास हवेच आहे. मिरासदारी व दहशत नष्ट करूनच इंग्रजी ही भारतीय भाषांची भगिनी बनू शकते. इंग्रजीचे जागतिक स्थान व महत्त्व असे खचितच नाही की, भारतीय भाषांचे मातृभाषा, शिक्षणाची माध्यम भाषा व आंतरभारतीय दळणवळणाची भाषा म्हणून असणारे स्थान व महत्त्व गौण ठरावे. तिचे महत्त्व हे खासच नाही की, जणूकाही ती महाराष्ट्रातल्या शाळेत जाणाऱ्या सर्व मुलामुलींची मातृभाषासदृश भाषा बनावी. ज्यांना आंतरभारतीय व जागतिक पातळीवरील ज्या व्यवहारांसाठी ज्या पातळीचे इंग्रजीचे ज्ञान गरजेचे आहे ते संपादित करता येण्यासाठी इंग्रजीच्या शिक्षणाची व्यवस्था कशी करणे सुयोग्य होईल, याचा शोध घेण्यात विवेक आहे.

उच्च तांत्रिक वा विशेषीकृत शिक्षण, उद्योग-व्यवसायांचे विशिष्ट स्वरूप, व्यापार व दळणवळण यांसाठीची गरज, यामुळे सरासरी सामान्य पातळीपेक्षा वरच्या दर्जाचे इंग्रजी येणे आवश्यक आहे असे कोणत्या टप्प्यावर ठरते व किती टक्के लोकांच्या बाबतीत ठरते? इंग्रजीची मिरासदारी व दहशत कायम राहिलेल्या आजच्या काळातही, शिक्षितांपैकी देखील फार फार तर चारदोन टक्के व्यक्तींनाच उच्चतर पातळीवरचे इंग्रजीचे ज्ञान व कौशल्य त्यांच्या व्यावसायिक जीवनाच्या *आरंभबिंदूच्या जागी*च गरजेचे असते. बव्हंशी सर्वांना व्यवसाय/नोकरी करता करता इंग्रजीतली क्षमता वाढविण्यास सवड असते. आणि भाषा ही अशी गोष्ट आहे की, सरावाने, वापराने भाषेचे ज्ञान वाढत जाते, भाषेवरची पकडही वाढत

जाते. ही प्रक्रिया शाळेत वा कॉलेजातही घडत नाही. घडवून आणण्याचे कारणही नाही. तेव्हा, अशा अतिशय अल्पसंख्य व्यक्तींच्या साठी बोजा वाटेल एवढे इंग्रजी सरसकट सर्वांना शिकणे तर आपण सक्तीचे करीत नाही ना, अशी शंका येते. जेव्हा समाजात अल्पसंख्य असलेल्या वरिष्ठ वर्ण-जातींमधूनच मुलेमुली शिकत तेव्हा हा प्रश्न न विचारूनही एक वेळ चालले असते. पण आज हा प्रश्न विचारण्याची गरज आहे.

१६. आपण जे शिक्षणक्रम पुढे घेणार आहोत, वा ज्या व्यवसायात आपण प्रवेश करू म्हणत आहोत, वा ज्या प्रकारच्या व्यापार-उद्योगात, दळण-वळणाच्या क्षेत्रात वगैरे आपण शिरणार आहोत त्यासाठी आपल्याला अधिक पुढच्या पातळीवरचे इंग्रजी यायला हवे असे लक्षात आल्यावर ते ज्ञान तसेच संभाषणाचे, लेखनाचे व अन्य स्वरूपाचे कौशल्य संपादन करण्यासाठी विभिन्न अभ्यासक्रम पार पाडण्याच्या पुरेशा सोयी उपलब्ध असण्याची खरी गरज आहे. पूर्वी शॉर्टहँड-टायपिंग शिकण्याच्या सोयी असत, किंवा आज संगणकाच्या 'भाषा' व तंत्रे शिकविण्याच्या सोयी आहेत, ह्या धर्तीवर इंग्रजी शिकविण्याच्या सोयी ही काळाची गरज म्हणता येईल.

आज आपल्याला हे माहीत आहे की, काही आठवड्यां-पासून ते वर्षभरापर्यंतचे, वा काही वेळा त्याहूनही दीर्घ मुदतीचे, भाषांचे अभ्यासक्रम जर्मन, फ्रेंच, जपानी, रशियन इत्यादी भाषांचे उपलब्ध असतात. काही दृक्-श्राव्य साधनांच्या मदतीने व सुयोग्य मार्गदर्शनाखाली सघन स्वरूपात गरजेनुसार बऱ्यापैकी अल्पमुदतीतही परकीय भाषा शिकता येते.

शालेय स्तरावरील (५वी ते १२वी) इंग्रजी शिक्षणाला फाटा द्यावा असे आम्ही सुचवीत नाही हे सांगायला हवे. पण आमच्या मते या टप्प्यांवर इंग्रजी शिकविण्याचे प्रयोजन काय आहे ते स्पष्ट करावयास हवे. ढोबळपणे अशी मांडणी करता येईल : भारताच्या कोणत्याही भागात गेल्यावर रस्त्यावर व बाजारात मोडके-तोडके का असेना इंग्रजी (व हिंदी) बोलता यायला हवे, इंग्रजी (व हिंदी) भाषेत होणारे संभाषण समजून घेता आले पाहिजे, व्यावहारिक स्वरूपाच्या सूचना, पत्रके वाचून समजून घेता आली पाहिजेत. तसेच, व्यावहारिक गरजां-पुरते, आपल्याला काय म्हणायचे आहे ते बऱ्यापैकी लिहून सांगता यायला हवे. अगदी व्याकरण-शुद्ध, अचूक लिहिता यायला पाहिजे याचा अतिरेकी आग्रह राखण्याचे कारण नाही. वर्तमानपत्रातल्या बातम्या वाचता येण्याइतपत भाषा (इंग्रजी व हिंदी) यायला हवी. हे एक प्रयोजन.

प्रत्येकच भाषा दैनंदिन जीवनव्यवहारासाठी वापरली जाते. पण भाषा केवळ हे व्यवहार पार पाडण्यासाठी नसते. भाषा विचार व्यक्त करण्यासाठी, कल्पना लढविण्यासाठी, साहित्य, तत्त्वज्ञान, धर्म यांच्या निर्मितीसाठीपण असते. इंग्रजी ही एक समृद्ध भाषा आहे, आणि तिचा याही अंगाने आपल्याला वारसा लाभलेला आहे. भाषाशिक्षण याही अंगाने थोडे व्हायला हवे. या दृष्टीने चांगली गोष्ट अशी की, सर्व वयोगटांसाठी साजरे असे, भारतीय परिस्थितीशी व सांस्कृतिक-सामाजिक पर्यावरणाशी अनुबंध असणारे, भारतीयांनी केलेले अभिजात वैचारिक व ललित लेखन निवडं करण्यासाठी उपलब्ध आहे.

आमच्या माहितीप्रमाणे दहावीपर्यंतच्या मुलांना लागणारे इंग्रजीचे ज्ञान हे व्यावहारिक कारणांसाठी जास्त लागते हे ध्यानात घेऊन अभ्यासक्रम व पाठ्यपुस्तके यांची पुनर्रचना अलीकडे केली गेली आहे. ती दिशा योग्य आहे. मात्र, इंग्रजी शिकविण्याच्या पद्धतींमध्ये तसेच इंग्रजी समाधानकारकपणे येते की नाही हे तपासण्याच्या/परीक्षेच्या पद्धती यांच्यात बदल जसे व जेवढे करावयास हवेत तेवढे झालेले नाहीत. शिक्षकांच्या मनाचे वळण बदलणे, त्यांच्या स्वतःच्या इंग्रजीच्या ज्ञानात व वापरातल्या कौशल्यामध्ये पुरेशी वाढ घडवून त्यांची इंग्रजीची भीती घालवून त्या जागी आत्मविश्वास उत्पन्न करणे, शिकविण्याचे योग्य व पुरेसा काळ प्रशिक्षण देऊन त्यांना आपण सक्षम असल्याची प्रचिती देणे, आणि त्यांना प्रेरित करणे यात व्यवस्था फार कमी पडली आहे.

१०वी पर्यंतची पायाभरणी जर नीट झाली तर ११वी-१२वीच्या टप्प्यावर ज्या ज्ञानशाखेत विद्यार्थी शिकत असतील त्या शाखेला अनुरूप असे इंग्रजीचे, एका बाजूला, व्यावहारिक व तांत्रिक-पारिभाषक शिक्षण तर, दुसऱ्या बाजूला, विचार-साहित्य-विज्ञान-कला या अंगांनी भाषेचा परिचय वाढविणारे शिक्षण देता येईल.

१७. इंग्रजीसाठी जेवढ्या तासिका आज शालेय पातळीवर दिल्या जातात तेवढ्या पुरत नाहीत असे जाणकारांचे मत दिसते. तासिका अपुऱ्या पडतात ही तक्रार, खरे तर, सर्वच विषयांबाबत असल्याचे दिसते.

याचे उत्तर, इंग्रजीचे शिक्षण पहिलीपासून सुरू करणे हे नाही. यामधून मुलांचा गोंधळ उडून भाषकदृष्ट्या ती आजच्यापेक्षा कच्ची राहतील हे वर दाखविले आहे. हसत-खेळत इंग्रजीचे सकस शिक्षण न होता खेळखंडोबा होऊन, इंग्रजीची भीती वाढेलच.

वेळ कमी पडतो याचे उत्तर 'कार्यानुभवा'साठीचे तास वापरणे हेदेखील नाही. शालेय शिक्षण केवळ पुस्तकी व पढिक नसावे, ते जीवनविन्मुख नसावे, हात-डोळे-हृदय यांचा संयोग साधावा, तसेच जीवनावश्यक काही व्यावहारिक कौशल्येही मुलांनी आत्मसात करावीत ही गरज वाढतेच आहे. कार्यानुभवा-बाबत प्रा. मोरे यांनी घेतलेली भूमिका त्यांची अदूरदृष्टी प्रकट करते. शिकणाऱ्या प्रत्येक विद्यार्थ्याला कारकुनी नोकरी करावयास मिळेल इतक्या संधी जरी अर्थव्यवस्थेत असल्या तरी, एक तर, जुन्याच पढिक-पुस्तकी वळणाचे शिक्षण त्या विद्यार्थ्यांचे नुकसान करणारेच ठरणारे आहे; आणि, दुसरी गोष्ट, समाजातील विषमता अधिक दृढ करणारे ते ठरेल. यात जे प्रवीण व यशस्वी ठरतील त्यांची मिरासदारी व दहशत इंग्रजीच्या मदतीने अधिकच बळकट करण्याचा तो मार्ग आहे.

विषयांचे व इतरही गोष्टींचे शिक्षण करण्यास वेळ पुरेसा मिळावयाचा असेल तर सुट्यांचे प्रमाण कमी करावयास हवे. शिक्षणाच्या नावाने खूप माहिती कोंबण्यावर व ती बिनडोकपणे आठवून परीक्षेत उतरविता येण्यावर जो कमालीचा भर आहे तो कमी करण्याला तेवढेच महत्त्व आहे. परीक्षा घेणे, उत्तरपत्रिका तपासणे, परीक्षेची पूर्वतयारी यासाठीही शिक्षकांचा व विद्यार्थ्यांचा फार अधिक वेळ जातो. विद्यार्थी ज्ञानसंपन्न, कुशल, सक्षम व स्वावलंबी बनण्याच्या दृष्टीने हा वेळ बव्हंशी वाया जातो. इथे गणिते वेगळी मांडून शिक्षणासाठी आवश्यक तो वेळ मिळविता येण्यासारखा आहे, आणि तो याच मार्गांनी हस्तगत करण्याची गरज आहे.

**नव्या धोरणावरून पडलेले दोन गट**

१८. महाराष्ट्र शासनाच्या इंग्रजीविषयक नव्या धोरणावरून राज्यात सरळ सरळ दोन तट पडलेले दिसतात. "बहुतेक शिक्षणतज्ज्ञांचा या निर्णयाला विरोध आहे; जनसामान्यांनी मात्र त्याचे मोठ्या प्रमाणावर उत्स्फूर्त स्वागत केले आहे.... हा विशिष्ट निर्णय आपल्या फायद्याचा आहे, अशी अनुकूल प्रतिक्रिया लोकांमध्ये का उमटली असावी?" असा प्रश्न उपस्थित करून श्री. सदा डुंबरे यांनी 'मराठी बुक्का कपाळी लावायचा असेल तर इंग्रजीची तलवार हाती हवी' (*साप्ताहिक सकाळ*, १२ फेब्रुवारी २०००) या त्यांच्या लेखात केलेल्या विवेचनाचा सारांश त्यांच्या शब्दांत असा : "तिच्या (इंग्रजीच्या) अभावामुळे आपण मात्र 'मार्जिनलाइज्ड' होत आहोत, या व्यावहारिक सत्याची प्रचिती त्यांना अनेक महत्त्वाच्या टप्प्यांवर येत आहे.... नव्या परिस्थितीची, बदलत्या काळाची आव्हाने पेलण्यासाठी इंग्रजी भाषेतील कौशल्य हे त्यांना शस्त्र वाटते, साधन वाटते. हे शस्त्र हाती आले तर आपला काही प्रमाणात निभाव लागेल, आपण तगून जाऊ अशी आशा त्यांना वाटते.... आसपासच्या परिस्थितीत त्यांना वरवर का होईना तसा पुरावा दिसतो.... नव्याने उदयाला येणाऱ्या ज्ञानाधारित जागतिक समाजात इंग्रजी भाषेतील कौशल्य ही गुरुकिल्ली असेल तर ती आमच्याही हाती हवी अशी या समाजघटकांची रास्त अपेक्षा आहे."

'पहिलीपासून इंग्रजी – का, कशी आणि विरोधक' या लेखात (*साधना*, १५ जानेवारी २०००) श्रीमती मीना चंदावरकर म्हणतात, "मुलांचे आईवडील, त्यांचे शिक्षक आणि स्वतः मुलंसुद्धा इंग्रजी शिकण्याबाबतीत उत्साही आहेत. आपल्या विद्यार्थ्यांना इंग्रजी आलंच पाहिजे, याची प्रबळ ऊर्मी सगळ्या शिक्षकांमध्ये आहे. ती आतल्या आत जिरता कामा नये. शहरी आणि ग्रामीण किंवा शहरातल्या मागास शाळांतूनसुद्धा हीच भावना आहे.".... "इंग्रजी भाषा समाजातल्या अमुक वर्गालाच परवडेल, इतरांना धड मराठीसुद्धा येत नाही ते इंग्रजी काय येणार, असा सूर लावणे म्हणजे शिक्षणातला ब्राह्मण्यवाद जोपासणं आहे."... " 'भटाबामणांनी' आपल्या मुलांना नुसतं इंग्रजीच नव्हे, तर इंग्रजी माध्यमातून शिक्षण देऊन आपल्या मुलाबाळांचं 'भाग्य उजळवलं' हे न कळायला बहुजनसमाजाने काय मूर्खपणाचा मक्ता घेतला आहे काय?" 'पहिलीपासून इंग्रजीचे शिक्षण' या निर्णयाला विरोध करणारे लोक, "खरं म्हणजे आपण भोगत असलेल्या समृद्धीत आणखी जास्त वाटेकरी नकोत म्हणून हे सामान्य लोकांचा अशा प्रकारे बुद्धिभेद करीत असावेत अशी मला दाट शंका आहे", असेही त्यांनी म्हटले आहे.

'बहुजनां'च्या हिताच्या विरोधी या अर्थाने 'ब्राह्मण्यवादी' भूमिका घेत असल्याचा, व अशी भूमिका घेण्यामागे स्वार्थी हितसंबंध असल्याचा, जुनीच जातपाताधिष्ठित विषम समाज-व्यवस्था कायम टिकविण्याचा डाव असल्याचा आरोप, हा गंभीरच आरोप आहे. समाजात, म्हणजे धुरिणांमध्ये दोन तट पडल्याचे दृश्य दिसत असल्याचे सदा डुंबरे यांचे निरीक्षण खरेच आहे. बहुजनसमाजाचे भले खरोखरी कोणत्या वाटेने जाण्यात आहे यावरूनचे प्रामाणिक मतभेद व्यक्त होत नसून,






येथे एका पक्षाची भूमिका स्वार्थी, लबाड व अप्रामाणिक आहे असा आरोप करून समाजाची विभागणी दोन छावण्यांमध्ये करण्याचीही गोष्ट घडत आहे.

महाराष्ट्र शासनाच्या या निर्णयावर टीकाटिप्पणी करणाऱ्यांची वस्तुतः स्वार्थी हितसंबंधी भूमिका असताना, ती लपवून तात्त्विक वा व्यावहारिक पातळीवरील प्रामाणिक मतभेद असा मुखवटा बुद्ध्या ते धारण करीत आहेत, हा आरोप असत्य, अन्याय्य आहे. अशा प्रकारचे आरोप केल्याने संवाद, चर्चा खुंटते, कट्टरता जोपासली जाते, व राजकारण-समाजकारण द्वेषमूलक बनते.

'पहिलीपासून इंग्रजीचे शिक्षण', या निर्णयाची पुष्टी करू इच्छिणाऱ्यांना विरोधकांचे मुद्दे खोडून काढण्यासाठी याप्रकारचे आरोप करण्याची गरज नाही.

श्री. सदा डुंबरे यांनी वर्णन केल्याप्रमाणे, आर्थिक-राजकीय-सामाजिकदृष्ट्या अभिजन वर्गात दाखल होण्याची आकांक्षा बाळगू शकण्याच्या स्थितीत असलेल्या ग्रामीण-शहरी, कनिष्ठ ते उच्चवर्गीय, सवर्ण-अवर्ण सर्व समाजघटकांना इंग्रजी हे या वर्गात दाखल होण्याच्या मार्गावरील एक महाद्वार आहे, वा गुरुकिल्ली आहे, असे अधिकाधिक प्रमाणात वाटत आहे, हे वास्तव आहे. ही धारणा इतकी सार्वत्रिक व पक्की बनावी याचे समाजशास्त्रीय विश्लेषण करता येते. इंग्रजीची मिरासदारी व दहशत संपुष्टात आणावयाची आणि तिला तिचे योग्य ते स्थान द्यावयाचे, याची जबाबदारी ज्या समाजधुरीण वर्गावर होती त्यांनी ती जबाबदारी पार पाडली नाही. याच्या मुळाशी वर्गीय हितसंबंध राखण्याचीच केवळ गोष्ट नव्हती. दीर्घकालीन वासाहतिक वारसा पुढे चालू ठेवण्याच्या स्वरूपातले जाड्य, 'इंग्रजीवाचून कसे चालणार' या धारणेमधून प्रकट होणारा स्वतःविषयीच्या आत्मविश्वासाचा भारतीय उच्चवर्गीयांच्या ठायी असलेला अभाव, सर्व विषयांमध्ये उच्च स्तरावरील ज्ञानभाषा, संज्ञापनभाषा ही आजच्या काळात केवळ इंग्रजीच असू शकते ही खात्री असे इतरही घटक याला कारणीभूत होते. कारणे कोणतीही असोत, परिणाम हाच झाला की, इंग्रजीची मिरासदारी व दहशत कायमच राहिली. इंग्रजी आत्मविश्वासाने (प्रसंगी इंग्रजी चांगले येत नसूनही बेधडक आत्मविश्वासाने) व काही प्रमाणात सफाईने वापरता न येणाऱ्यांची अवहेलना वाढली, तसेच विशेषेकरून पांढरपेशा नोकरी-व्यवसायांच्या क्षेत्रात त्यांच्या उत्कर्षाच्या वाटा रोखल्या गेल्या. भारतीय मानसाची ठेवण अशी आहे की, पांढरपेशा (ब्राह्मणी?) दर्जा प्राप्त करण्यास विशेष महत्त्व आहे. सत्ता, मत्ता व प्रतिष्ठा यांचा सोपान वरच्या पायऱ्यांवर चढून जावयाची आकांक्षा असेल तर इंग्रजी (व इंग्रजीतून शिक्षण घेण्याबरोबर येणारे साहेबी वळण) उपयोगी व आवश्यक आहे हा निवाडा वास्तववादी ठरला. तात्पर्य, श्री. सदा डुंबरे व श्रीमती मीना चंदावरकर यांनी परिस्थितीचे जे चित्रण केले आहे ते वस्तुस्थितीनिदर्शक आहे. गोष्ट केवळ वाटण्याची नाही, ती काही अंशी तशी असण्याचीपण आहे. कितीही खेद वाटला, शरम वाटली तरी हे वास्तव स्वीकारण्यातच शहाणपण आहे.

१९. पण याचा अर्थ 'पहिलीपासून इंग्रजीचे शिक्षण' हा निर्णय योग्य आहे, वा खरोखरी जनसामान्यांच्या भल्याचा आहे असे निष्पन्न होत नाही.

जनसामान्य कोणाला म्हणणे सार्थ ठरते, या प्रश्नाचे उत्तर, जे ब्राह्मण वा तत्सम उच्चवर्णीय नाहीत ते, तसेच जे अमुक इतके आर्थिकदृष्ट्या वरिष्ठवर्गीय नाहीत ते सर्व, हे देणे या संदर्भात फसवे व घातक आहे. एका ठराविक दारिद्र्य-रेषेखालील सर्व दरिद्री एवढे म्हणणे पुरेसे नाही; दारिद्र्याची प्रतवारी निश्चित करणे, कोण कोणत्या कारणाने दारिद्र्याच्या उतरंडीत सापेक्षतः खालच्या पायऱ्यांवर आहेत, आणि ते इतके खाली असण्याची कारणे कोणती, यांच्या खोलात जाण्याची असलेली नितांत गरज व महत्त्व अमर्त्य सेन यांनी त्यांच्या *पॉव्हर्टी अॅन्ड फॅमिन्स* या ग्रंथात सांगितले आहे. दारिद्र्यनिवारण करावयाचे झाल्यास वेगवेगळ्या दरिद्री समूहांसाठी आवश्यक उपाययोजना वेगवेगळ्या असतात हे त्यांनी 'दुष्काळी' उपासमारीचे निवारण करण्याच्या संदर्भात दाखवून दिले. ही गोष्ट येथेही खरी आहे असे आम्हांला दिसते. जनसामान्य या कोटीत समाविष्ट असणाऱ्या लोकसंख्येत (व जातिजमातींमध्येही) बरीच मोठी उतरंड आहे आणि वंचित-दलित असण्याची कारणे सर्वांची तीच एक नाहीत.

अभिजनवर्गात प्रवेश करण्याची आकांक्षा बाळगू शकण्याच्या स्थितीत असणारा, आणि अभिजनवर्गात प्रवेश करण्यासाठी कापावे लागणारे अंतर सापेक्षतः पुष्कळ कमी असणारा जो 'जनसामान्य'समूह आहे त्याला इंग्रजीचे वाटणारे महत्त्व आणि त्याचा इंग्रजी माध्यमाच्या शाळांवरील भर वास्तववादी म्हणता येईल. हा थर वस्तुतः कनिष्ठ व मध्यम-वर्गीयांचा आहे. पण म्हणून जनसामान्य कोटीतल्या इतर सर्व









थरांच्या व घटक-समूहांच्या संदर्भात असा भर त्यांचे भले साधण्याच्या दृष्टीने वास्तववादी व उपकारक ठरेलच असे नाही. जनसामान्य, बहुजनसमाज या कोटींचे असे तपशिलामध्ये जाऊन सखोल विश्लेषण करावे ही व्यवहारात त्यांच्या अभ्युदयाच्या संदर्भात गरज आहे.

या कोटीतल्या अनेक थरांची व समूहांची अग्रक्रमाची गरज पहिलीपासून इंग्रजी ही नाही. स्वतःच्या बोलीभाषेपलीकडे असलेल्या 'प्रमाण' स्वभाषेचे चांगले शिक्षण ही त्यांची अधिक निकडीची गरज आहे. किंवा, त्याही आधी, वेगवेगळ्या कारणांनी खंड न पडता मुलांचे शिक्षण करता येईल अशी क्षमता पालकांच्या ठायी उत्पन्न होईल, तसेच त्यांचे शिक्षण हे पढिक पुस्तकी व जीवनविन्मुख न राहता ते त्यांना त्यांच्या परिस्थितीला अधिक समर्थपणे तोंड देऊन स्वतःची स्थिती सुधारण्यासाठी उपयोगी व परिणामकारक सहाय्य करणारे ठरेल, हे पाहण्याची गरज आहे. अशी भूमिका ही विषमता कायम राखू पाहणारी, ब्राह्मण्यवादी म्हणण्याचे कारण नाही. ती यथार्थ नाही हे अनुभवाच्या, योग्य सुसंगत युक्तिवादांच्या आधारे दाखवून देण्याचा मार्ग मोकळा राहतो.

येणाऱ्या भविष्यकाळात विभिन्न क्षेत्रांमध्ये चांगले इंग्रजी येणे गरजेचे आहे, आणि तेवढे चांगले इंग्रजी आपल्या मुलांना यावे असे पालकांना वाटते, हे स्वीकारणे म्हणजेच पहिलीपासून इंग्रजीचे शिक्षण देण्याची आवश्यकता मान्य करणे, असेही होत नाही. आज जर मुलांना गरजेएवढे चांगले इंग्रजी येत नसेल तर त्याचे एकमेव कारण ५वी पासून इंग्रजी विषय सुरू होणे हे आहे, हे प्रतिपादन आपोआपच खरे ठरत नाही. शिक्षक तुल्यबल व चांगले आहेत, तरीपण इतर विषयांचे शिक्षण उत्तम होते, इंग्रजीचे मात्र होऊ शकत नाही, आणि याची अमुक अमुक कारणे आहेत, असे ज्या अभ्यासांवरून म्हणता येईल असे अभ्यास झाल्याचे आढळत नाही. मुंबईतील अवल दर्जाच्या बालमोहन शाळेचे उदाहरण डुंबरे यांनी दिले आहे. **मराठी माध्यमाच्या शाळेत ५वी ते १०वी या काळात इंग्रजी अपेक्षेइतके शिकविता येत नाही या अनुभवामुळे** बालमोहनने इंग्रजी माध्यमाचा विभाग सुरू केला असे दिसत नाही.

तेव्हा, पहिलीपासून इंग्रजीचे शिक्षण हा निर्णय चुकीचा व घातक आहे असे म्हणणारे इंग्रजी चांगले येऊ नये असा पक्ष घेत आहेत; त्यातही, समाजातल्या अल्पसंख्य वरिष्ठ-वर्गीयांचा अपवाद वगळता, बहुजनसमाजातल्या मुलामुलींना इंग्रजी येऊ नये या स्वार्थी हेतूने हा पक्ष ते घेत आहेत, हा युक्तिवाद टिकणारा नाही. इंग्रजी आवश्यक त्या गुणवत्तेचे, चांगल्या दर्जाचे यावे की नाही यावरून वाद नाही. कोणत्या गुणवत्तेचे इंग्रजी शिक्षणाच्या कोणत्या स्तरावर आवश्यक, 'चांगल्या दर्जा'चे म्हणजे कोणत्या दर्जाचे, तेवढे इंग्रजी येण्यासाठी ५वी ते १०वी, व ११वी-१२वी हे दोन टप्पे खरोखरच अपुरे आहेत का, इंग्रजी असमाधानकारक असण्याचे कारण चांगल्या शिक्षकांचा अभाव हे तर नाही, अशासारखे मुद्दे आहेत व त्यावरून वाद आहेत.

यासारख्या मतभेदाच्या मुद्द्यांवरून निकोप वादविवाद होणे समाजाचे पाऊल पुढे पडण्याच्या साठी उपकारकच असते. उदाहरणार्थ, सदा डुंबरे यांनी त्यांच्या *साप्ताहिक सकाळ* मधील लेखात काही प्रश्न विचारले आहेत ज्यांची उत्तरे शोधण्यामधून समाजस्थितीवर अधिक प्रकाश पडेल.

२०. बहुजनसमाज, जनसामान्य हे शब्द सोयीने, सैलपणाने वापरावयास फार चांगले आहेत. तसेच 'ब्राह्मण्यवाद', 'मनूवादी' असेही शब्द. पण एक गोष्ट खरीच आहे. राजकीय निर्णयप्रक्रियेवर ज्यांची पकड आहे त्या वर्गांना, विभिन्न जातिजमातींमधील अभिजनांना, व अभिजन वर्गामध्ये प्रविष्ट होण्याची आकांक्षा बाळगणाऱ्या व ती शक्यता नजरेच्या टप्प्यात आलेल्यांना त्यांच्या मुलाबाळांना स्वभाषेइतकी, वा कांकणभर अधिकच चांगल्या दर्जाची, इंग्रजी यावी ही इच्छा आहे. या प्रयत्नात स्वभाषेच्या शिक्षणाची हेळसांड झाली तरी त्यांना चालणार आहे. मराठी काय, तशीही येतेच; तिचे खास शिक्षण द्यायलाच हवे असे नाही, ही त्यांची धारणा आहे. या जनांचे मानस प्रा. मोरे चांगल्या प्रकारे जाणतात, कारण त्यांचा या जनांमध्ये सतत वावर असतो.

आपण टाकतो आहोत ते पाऊल समाजहिताच्या दृष्टीने अत्यावश्यक आहे, ते अत्यंत कालोचित व म्हणून प्रागतिक आहे याची त्यांना इतकी निःशंक खात्री आहे की, याविषयी व्यापक संवाद-चर्चा चालविण्याची त्यांना गरज वाटली नाही.

नगरसेवक, आमदार, खासदार यांच्यासाठी वाढीव मानवेतन, भत्ते, सोयीसवलती, खास विकासकार्य विधी अशा प्रकारच्या तरतुदी करण्याचे प्रस्ताव कोणाच्याही राजवटीत विशेष प्रयास न पडता मंजूर होतात, आणि राजवट बदलली तरी ते कधी उलटविले जात नाहीत, हा आपला अनुभव

आहे. पहिलीपासून इंग्रजी, शाळाशाळांमधून दुर्गम खेड्यापाड्यांत संगणक-इंटरनेटचे शिक्षण यासारखे प्रस्ताव आज या अर्थाने 'लोकप्रिय' आहेत. याचेही भान एक यशस्वी व अनुभवी जाणकार राजकारणी या नात्याने प्रा. रामकृष्ण मोरे यांना आहे.

'इंग्रजी शिक्षण' हे 'वाघिणीचे दूध' म्हटले गेले तेव्हा 'इंग्रजी भाषेतून शिक्षण' असा त्याचा अर्थ केला गेला नव्हता. तर नवविचारांचे (यात साहित्यही आले), नव्या जीवन दृष्टीचे शिक्षण असा अर्थ केला गेला होता. 'इंग्रजी भाषेच्या माध्यमामधून व्यापार, उद्योग, संशोधन, संज्ञापन, जीवनशैली इत्यादी इत्यादी अनेक क्षेत्रांमध्ये व्यवहार करण्याचे शिक्षण' हे आजचे व उद्याचे नवे 'वाघिणीचे दूध' आहे, अशी आजची नवी भूमिका आहे. हे दूध पिऊन, त्यावर पोसले जाऊन आपण मराठी भाषक प्रथम सबळ झालो तरच मराठी भाषाही उद्याच्या सहस्रकात टिकाव धरील, भरभराटेल, कारण सबलांचीच भाषा प्रतिष्ठा पावते, अशा आशयाचा युक्तिवाद सदा डुंबरे यांनी त्यांच्या लेखात केला आहे.

याच एक मार्गाने बहुजनांचे, मराठी भाषा व संस्कृती यांचे भले होणे शक्य आहे; विषमता मोडून समता व न्याय यांची प्रस्थापना होणार आहे, हे मतही प्रामाणिक आहे. हे मत जर आज वरचढ असेल तर, लोकशाही रीतीला अनुसरून, त्याचा प्रयोग काही काळ व्हावा, हे उचित होय. समता व न्याय यांच्या प्रस्थापनेच्या दृष्टीने मंडल आयोगाच्या शिफारशी, राखीव जागांची तरतूद, महिलांसाठी आरक्षण या उपाययोजनांच्या संचात आणखी एका उपायाची भर पडत आहे. या सगळ्यांचा पुरेसा अनुभव गाठीशी बांधला जाण्याची ऐतिहासिक अनिवार्यता आम्हाला दिसते.

**चोख अंमलबजावणी : काही शर्ती**

२१. पहिलीपासून इंग्रजीचे शिक्षण या निर्णयाची अंमलबजावणी करण्याच्या बाबतीत पुढील काही मुद्दे उपस्थित करणे आवश्यक आहे. लोकमताचा पुरेसा व्यापक पाठिंबा दिसत असल्याने हा निर्णय राबविणे उचित होईल ही भूमिका वर घेतली आहे, या पार्श्वभूमीवर, हे अडवणुकीचे मुद्दे नाहीत ही गोष्ट लक्षात घ्यावी.

(१) श्री. सदा डुंबरे यांनी त्यांच्या *साप्ताहिक सकाळ* मधील लेखात सूचित केल्याप्रमाणे, शालेय स्तरावर, अपवाद वगळता, सर्वच विषयांच्या शिक्षणाचा स्तर चिंता करावी इतका खालावलेला आहे. अशा स्थितीत, इंग्रजीचे शिक्षण तेवढे शाळा-शाळांमधून चांगले होईल, हे गृहीत धरता येणार नाही.

किंबहुना, सर्वच विषयांच्या शिक्षणाचा दर्जा उंचावत नेता आला तरच इंग्रजीच्या शिक्षणाचे धोरण किमान पातळीवर तरी यशस्वी ठरेल, एरवी नाही, हे मनात ठसले पाहिजे.

(२) राजकारणी पुढारी व नोकरशाही या दोन्हींचे धोरण वस्तुस्थितीकडे डोळेझाक करण्याचे, तिच्यावर पांघरूण घालण्याचे, सारवासारव करून सगळे आलबेल आहे असे जाहीर करण्याचे राहिले आहे. हे धोरण अंगिकारण्यात त्यांचे हितसंबंध गुंतलेले असतात, ही अनुभवाची गोष्ट आहे.

इंग्रजीविषयक नव्या धोरणामधून काही चांगले निष्पन्न व्हावयाचे असेल तर अप्रामाणिकपणे वा हितसंबंधापोटी केली जाणारी वंचना अजिबात परवडणारी नाही. ती खपवून घेतली जाणार नाही, वस्तुस्थितीची चोख नोंद केली जाईल, व निर्भीड कारवाई केली जाईल, हा संदेश वरपासून खालपर्यंत पोचला पाहिजे.

याचाच अर्थ, शिक्षण मंत्रालय व शिक्षण खाते यांच्यामधील वरिष्ठ अधिकारीवर्गाची स्वतःची कामगिरी प्रथम चोख व कार्यक्षम होताना अनुभवाला आली पाहिजे.

(३) शाळेत, विशेषतः प्राथमिक शालेय स्तरावर सर्व विषयांच्या शिक्षणाची गुणवत्ता उंचावण्यासाठी आवश्यक ती सर्व पावले टाकण्याचे अधिकार असलेली, पुरेसा निधी व पुरेशी स्वायत्तता असलेली एक यंत्रणा निर्माण करावी हे योग्य दिसते. यासाठी गुणवत्ता, मूल्यनिष्ठा व प्रेरणा, कार्यदक्षता या कसोट्यांवर आज शासकीय यंत्रणेत असलेल्या अनेकानेक व्यक्तींची चोखंदळ निवड करणे अशक्य नाही. यांच्या जोडीला निवृत्त वा आजही सेवेत असलेल्या उत्तम शिक्षकांनाही या यंत्रणेत सामील करून घेता येईल, हितसंबंधी अदूरदर्शी राजकारणी हस्तक्षेपापासून ही यंत्रणा मुक्त राखणे जमले तर चांगले परिणाम चारपाच वर्षांच्या काळात दिसू लागतील.

(४) इतर विषयांचे शिक्षण समाधानकारकपणे होत नाही, पण म्हणून त्या विषयांचे शिक्षण नका करू, असा युक्तिवाद जर करीत नसाल, तर मग इंग्रजीलाही तोच न्याय लावावा, असे म्हटले जात आहे.

एक तर, ज्या कारणाने इंग्रजी विषय पहिलीपासून सुरू केला जात आहे त्या कारणाला – 'एरवी इंग्रजी आवश्यक तेवढे चांगले येणार नाही' – या युक्तिवादाने छेद जातो.






इंग्रजी विषय पहिलीपासून सुरू करण्यामागचा एकमेव हेतूच साध्य होणार नाही.

दुसरी गोष्ट, इतर विषयांबाबतही, इतके हे सारे विषय कच्चे राहत असतील तर मुलांचे शिक्षण होत आहे की त्यांच्यात अशिक्षितपणाच बिंबवला जात आहे, हा प्रश्न उपस्थित करण्याची वेळ आली आहेच.

(५) सर्व प्राथमिक शाळांतील सर्व शिक्षक प्रेरणाशून्य आहेत, वा ते इंग्रजी विषय शिकवूच शकणार नाहीत, असे म्हणणे अन्याय्य ठरेल हे निर्विवाद. त्याच वेळी, जिल्हा परिषदा, नगरपालिका/महानगरपालिका यांच्या मराठी माध्यमाच्या शाळा, अनेक खाजगी संस्थांच्या शाळा यांमध्ये शिक्षण फारसे होत नाही ही जागरूक व आकांक्षी पालकांची तक्रार, मुलांचे शिक्षण जरा तरी चांगले व्हावे या कारणाने इंग्रजी माध्यमाच्या शाळांची जबर फी देऊन तिथे मुले पाठविण्याकडे आढळणारा वाढता कल, या गोष्टी कपोलकल्पित मानावयाच्या का?

निष्पक्षपणे परीक्षण केल्यास बहुधा बहुसंख्य शाळांचे, विशेषतः प्राथमिक शाळांचे कामकाज अत्यंत असमाधानकारकपणे चालत असल्याचे आढळून येईल. या वस्तुस्थितीला मोकळेपणाने सामोरे गेल्यासच या नव्या निर्णयाच्या सुयोग्य अंमलबजावणीची शक्यता निर्माण होईल. स्वभाषा मराठीचा पाया भक्कम न करताच इंग्रजीचे कसेतरी शिक्षण मुलांचे झाले तर त्या मुलांचे फार मोठे भाषिक-सांस्कृतिक नुकसान होईल. आणि ही मुले-मुली बव्हंशी सर्वस्वी जनसामान्यांची व जास्त करून ग्रामीण भागातील असतील. विषमतेची आधीच असलेली दरी अधिक रुंद व अनुल्लंघनीय बनण्यात याचा परिणाम होईल.

या कारणाने ज्यांचा या नव्या धोरणाला पाठिंबा आहे त्यांनी अधिकच परखड, चोख व कठोर राहण्याची गरज आहे. जातपात, प्रादेशिकता, नातेगोते व लागेबांधे, गटबाजी या सगळ्याच्या पलीकडे जाण्याविषयी आग्रही राहिले पाहिजे.

(६) हे शिवधनुष्य पेललेच पाहिजे, हा निर्धार लागेल. मग यासाठी योग्य ती पूर्वतयारी करण्यासाठी एक पूर्ण वर्ष देणे, व जशी पूर्वतयारी होईल तशी अंमलबजावणी करणे शहाणपणाचे होईल. शिक्षक प्रशिक्षणाची स्थायी व्यवस्था उभारणे व ती चोखपणे राबवून वर्षभरात प्रत्येक जिल्ह्याच्या स्तरावर शिक्षकांचे प्रशिक्षण, मार्गदर्शन व देखरेख करू शकणारी सक्षम टोळी सिद्ध करणे ही सर्वाधिक निर्णायक पूर्व तयारी असेल. अजूनही वेळ गेलेली नाही. इ.स. २००० ऐवजी इ.स. २००१ पासून, पूर्वतयारीनंतर, या निर्णयावर अंमलबजावणी करण्याचा विवेकी निर्णय शासन घेऊ शकेल.

**स्वभाषांचा पक्ष घेणाऱ्यांपुढील आव्हान**

२२. प्रा. रामकृष्ण मोरे यांची *साधना* साप्ताहिकासाठी सुप्रसिद्ध तरुण लेखक श्री. हरी नरके यांनी मुलाखत घेतली तेव्हा शेवटी डॉ. राममनोहर लोहिया यांच्या भूमिकेचा मुद्दा उपस्थित केला. त्यांनी जाणीवपूर्वक ही गोष्ट केलेली असावी. आपण इंग्रजीविषयी जे धोरण अंगीकारत आहोत ते डॉ. लोहियांच्या भूमिकेशी सुसंगत कसे आहे हे 'स्पष्ट' करण्याचा, व स्वतःच्या निर्णयाचे समर्थन लोहियांचा आधार घेऊन करण्याचा प्रा. मोरे यांचा प्रयत्न उघड दिसून येतो.

आपण जे नवे धोरण अंमलात आणणार आहोत ते, 'इंग्रजीचे प्रस्थ माजवून नवी जातिव्यवस्था' जी निर्माण केली गेली ती मोडणारे क्रांतिकारक धोरण आहे, असा प्रा. मोरे यांचा दावा आहे.

पण हा त्यांचा दावा मान्य करता येत नाही. डॉ. लोहिया हयात नसल्याने, त्यांनी काय टिप्पणी केली असती त्याची काही कल्पना जरी करता येत असली तरी, प्रा. मोरे सुरक्षित राहतात. पण आमच्या मते त्यांनी लोहियांचा आधार घेत दिलेले स्पष्टीकरण व केलेले समर्थन गैर व चुकीचे आहे.

इंग्रजीची मिरासदारी व दहशत दूर करण्यासाठी ज्या जागी प्रहार करायला हवेत त्या जागांविषयी व त्यासाठी आवश्यक ती धोरणे व कृती यांविषयी चुकून निर्देशदेखील प्रा. मोरे यांच्या मुलाखतीत नाही.* इंग्रजीचे प्रस्थ कमालीचे माजलेले आहे अशा स्थितीत आपण आहोत. या स्थितीची ऐतिहासिक, सामाजिक, राजकीय, बौद्धिक-सांस्कृतिक मीमांसा स्वतःशी तरी प्रा. मोरे यांनी केली आहे का, याविषयी शंका उत्पन्न होते.

इतर सगळ्या भाषा – अर्थातच स्वभाषा मराठी सोडून – गरज उत्पन्न होईल तेव्हा गरजेनुसार कमीजास्त पातळीच्या आपण शिकू शकतो, पण इंग्रजी मात्र पहिलीपासून शाळेत शिकविल्याखेरीज, आणि ती शिकविण्यासाठी आवश्यक तर इतर विषयांसाठीचा वेळ कमी करून पण पहिलीपासून शिकविल्याखेरीज येऊ शकणार नाही, ही भूमिका दहशतीच्या प्रभावाखाली व न्यूनगंडापोटी घेतली जात आहे. असो.









२३. ज्यांना प्रा. मोरे यांची भूमिका, धोरण अविवेकी व आत्मघातकी वाटते त्यांच्यासमोर विधायक पुरुषार्थाचे आव्हान उपस्थित आहे. हे आव्हान दुहेरी आहे. (१) स्वभाषा मराठीच्या सामर्थ्याविषयी आत्मविश्वास उत्पन्न करून, महात्मा गांधींच्या भाषेत 'गुलामी मनोवृत्ती'मधून समाजधुरीण वर्गातील पुरेशा व्यक्तींची सुटका करणे, हा एक पदर. हे घडत नाही तोवर इंग्रजीची मिरासदारी व दहशत नष्ट करता येणार नाही. मराठीची सक्षमता व सामर्थ्य सर्व क्षेत्रांत व्यवहारात प्रकट करणारा पुरुषार्थ जागवून व दाखवून हा आत्मविश्वास उत्पन्न करता येईल. शासनमुक्त राहून स्वतःच्या अभिक्रमाने व परिश्रमाने, कल्पकतेने व योजकतेने करावयाची हवी-तेवढी कामे मराठीवर प्रेम सांगणाऱ्यांसाठी निमंत्रण देत उभी आहेत.

(२) बहुजनसमाजातील ज्या मुलांना डोळ्यांसमोर ठेवून प्रा. मोरे यांनी धोरणात बदल केला आहे त्या मुलांना पर्याप्त कोटीचे इंग्रजी चांगल्या प्रकारे शिकविण्याचे, त्यांचा न्यूनगंड व त्यामधून उत्पन्न होणारी भीती दूर करून त्यांना आत्मविश्वास-संपन्न बनविण्याचे पर्यायी मार्ग व्यवहार्य असल्याचे दाखवून देणारे काम काही शाळांमध्ये, व शाळांबाहेरही, ठोस स्वरूपात करावयास हवे.

वरील दोन कार्ये पार पाडण्यासाठी निर्धारपूर्वक किती मंडळी एकत्र येतात व ती काय करतात हे आता पाहावयाचे आहे. मराठीचा पक्ष घेणाऱ्यांनी आजवर याबाबतीत पुरेशा प्रमाणात कर्तृत्व प्रकट केलेले नाही. जे काही या दिशेने काम झाले आहे ते शासनाच्या आश्रयाने बव्हंशी झाले व चालले आहे असे दिसते. समाजधुरीण वर्गाची मनोधारणा वदलण्याच्या दृष्टीने हे काम प्रभावी अजिबात ठरलेले नाही. असे का झाले यासाठी या पक्षाच्या मंडळींनी प्रांजळ आत्मपरीक्षण करून, उभारीने कामास लागले पाहिजे.

इंग्रजीचे शिक्षण शाळेबाहेर, स्वतंत्रपणे, योग्य पद्धतीने देणाऱ्या संस्था जागोजाग उभारणे, मराठी व इंग्रजी दोन्हींमध्ये क्षमता उत्पन्न करणारे वर्ग चालविणे, शिक्षक तयार करणे ही कामे हा या कार्याचा एक भाग असेल. भाषांचे शिक्षण योग्य प्रकारे करणाऱ्या स्वायत्त शाळा उभारणे हा पण त्या कामाचा एक भाग असेल.

*वसंत पळशीकर*



# मराठीचे भवितव्य

**सुधीर रसाळ**

संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेनंतर मराठी भाषा आणि मराठी संस्कृती यांच्या विकासाला वेग येईल असे वाटले होते. भाषावार प्रांतरचनेच्या मागणीमागे उद्दिष्टही हेच होते. परंतु घडत गेले उलटेच. मराठीचा विकास बाजूलाच राहिला, त्या ऐवजी एकेका जीवनव्यवहारातून मराठी भाषेच्या हकालपट्टीला प्रारंभ झाला. गेल्या चाळीस वर्षांत ज्ञानभाषा म्हणून मराठीचा विकास करण्याचे प्रयत्न गांभीर्याने झाले नाहीत. त्या ऐवजी, मराठी अगर भारतातील प्रांतिक भाषा या कधीही ज्ञानभाषा होणार नाहीत असा समज आपल्याकडे खोलवर रुजत गेला. गेल्या चाळीस वर्षांत महाराष्ट्रातील मोठ्या शहरांतून मराठी ही सार्वजनिक व्यवहाराची, व्यवसायाची, बाजाराची भाषा राहिली नाही. संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेनंतर प्रशासकीय व्यवहार मराठीतून होण्याचे प्रमाण बरेच वाढले असले तरी ती पूर्णतः राजभाषा बनू शकली नाही. मराठीच्या अभ्यासाची स्थितीही समाधानकारक नाही. काही तात्कालिक व्यावहारिक कारणांमुळे मराठीच्या विद्यापीठीय अभ्यासाला विद्यार्थ्यांची गर्दी जरी वाढली असली तरी मराठीच्या अध्ययन-अध्यापनाचा दर्जा कमालीचा घसरला आहे. अशा परिस्थितीत मराठी भाषा रुजविण्याचे, टिकविण्याचे आणि संवर्धित करण्याचे बुद्धिपुरस्सर प्रयत्न झाले नाहीत तर भावी काळात मराठी भाषेचे आणि संस्कृतीचे नाव जगाच्या भाषिक-सांस्कृतिक नकाशावरून कायमचे पुसले जाईल अशी भीती वाटू लागली आहे.

आपण प्रथम मराठी भाषेच्या अध्यापन-अध्ययनाचा विचार करू. संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेनंतर महाराष्ट्रात शिक्षणाचा स्फोट झाला. खेड्यापाड्यांतही भराभर हायस्कुले आणि महाविद्यालये निघत गेली. महाराष्ट्र-राज्यस्थापनेच्या आधी महाराष्ट्रात जेमतेम तीन विद्यापीठे होती. त्यांपैकी मुंबई विद्यापीठात तर मराठी भाषेच्या अध्ययन-अध्यापनाची उपेक्षा करण्याची परंपरा होती. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर मराठी भाषा, साहित्य, इतिहास यांच्या विकासासाठी १९४९ साली पुणे विद्यापीठ स्थापन झाले. आज महाराष्ट्रात नऊ विद्यापीठे, शेकड्यांनी महाविद्यालये आणि हजारोंनी हायस्कुले असूनही प्रत्यक्षात मात्र मराठी भाषेचे, तिच्या अध्ययन-अध्यापनाचे धिंडवडेच निघत आहेत. व्याकरणाचे आणि लेखनाचे नियम पाळून चार नीट वाक्ये लिहिण्याची क्षमताही या शिक्षणपद्धतीने विद्यार्थ्यांत निर्माण केलेली नाही.

शाळा-कॉलेजांची झपाट्याने झालेली वाढ स्वागतार्ह जरी असली तरी ही वाढ होताना पात्र असे शिक्षक या सर्व शाळा-कॉलेजांना पुरविण्यासाठी आपण खास प्रयत्न केले नाहीत. ज्यातून शाळांसाठी शिक्षक तयार होतात अशा महाविद्यालयीन पातळीवरच्या शिक्षणाची अवस्था अतिशय वाईट आहे. मराठीतील अभिजात, श्रेष्ठ साहित्यकृतींचा अभ्यास विद्यार्थ्याने करावा, मराठी वाङ्मयीन परंपरेचे सखोल ज्ञान त्याला व्हावे, त्याची वाङ्मयीन समज आणि अभिरुची समृद्ध होऊन वाङ्मयाच्या अचूक मूल्यमापनाची क्षमता त्याला प्राप्त व्हावी, या उद्दिष्टांतून विद्यापीठीय अभ्यासक्रम तयार होतात काय? बहुतेक ठिकाणी, "आमचे विद्यापीठ हे प्रादेशिक विद्यापीठ आहे" असे सोयीस्कर कारण पुढे करून आपापल्या भागातील आणि त्यातही "आपल्यापैकी" असलेल्या लेखकांची पुस्तके लावली जातात. पुस्तके नेमली जाताना लेखक, त्यांचे गट, प्रकाशक यांचे दबावाचे राजकारणही चालू असते. इथे तिथे किरकोळ फरक करीत आणि एखाद्या-दुसऱ्या नव्या विषयपत्रिकेचा समावेश करीत स्वातंत्र्यपूर्वकाळापासून चालत आलेला अभ्यासक्रमाचा साचा आजही आपण टिकवून ठेवला

---

* पुणे विद्यापीठाच्या सुवर्ण महोत्सवानिमित्त पुणे विद्यापीठात दि. ११, १२ व १३ जानेवारी १९९९ला झालेल्या 'मराठीचे अध्यापन, मराठी माध्यम आणि मराठीचे भवितव्य' या विषयावरील परिसंवादात केलेल्या बीजभाषणाच्या लिखित संहितेचे संक्षिप्त स्वरूपात येथे पुनर्मुद्रण करीत आहोत. मराठी भाषा, साहित्य व संस्कृती यांना हिंदी भाषेचा प्रसार व प्रभुत्व यांपासून धोका उत्पन्न झालेला आहे, या मुद्याचे विवेचन करणारा भाग प्रामुख्याने येथे वगळला आहे. – *संपादक*

अनुक्रमणिका

आहे. त्यामुळे वाङ्मयीन समज नसलेले, मराठी वाङ्मयाचे आणि भाषेचे ज्ञान नसलेले, केवळ "प्रमाणपत्रधारक" असे हजारो विद्यार्थी आपण गेल्या चाळीसएक वर्षांपासून निर्माण करीत आलो. अशा विद्यार्थ्यांतूनच मराठीचे शिक्षक बनले आणि याच प्रकारच्या विद्यार्थ्यांच्या पिढ्या निर्माण करण्याचे कारखाने त्यांनी चालू ठेवले. त्यामुळे या चाळीस-पन्नास वर्षांत मराठी वाङ्मयाभ्यासकांची, संशोधकांची नवी पिढी आपण घडवू शकलो नाही. गेल्या चाळीसएक वर्षांत मध्ययुगीन मराठी वाङ्मयाचा नाव घेण्याजोगा एकही अभ्यासक निर्माण झाला नाही. या क्षेत्रातील नामवंत अभ्यासकांची वये पासष्ट-सत्तर वर्षांच्या पुढचीच आहेत. मागच्या शतकातील काही अपवाद वगळले तर मराठी व्याकरणाचा आणि व्याकरणशास्त्राचा अभ्यास करणारे महाराष्ट्रात कोणीच नाहीत. भाषाविज्ञानाच्या अभ्यासाची सोय पुण्यातील डेक्कन कॉलेजात असूनही तिकडे मराठी विद्यार्थी फिरकत नसल्यामुळे भाषाविज्ञानाच्या अभ्यासाची, मराठी भाषेच्या भाषावैज्ञानिक अभ्यासाची परंपरा महाराष्ट्रात निर्माण झालेली नाही. अलीकडचे एकदोन अपवाद वगळता, मराठीत लोकसाहित्याच्या अभ्यासकांची परंपरा नाही. लेखकाच्या समग्र वाङ्मयाचा सांगोपांग अभ्यास सादर करणारे, एखादा कालखंड घेऊन त्यातील एकूण वाङ्मयाचा सर्वांगीण अभ्यास सादर करणारे ग्रंथ मराठीत अभावानेच आढळतात. मराठी वाङ्मयाचा नाव घेण्याजोगा इतिहास लिहिला गेला नाही; मग वेगवेगळ्या दृष्टिकोनांतून लिहिलेल्या इतिहासांची तर गोष्टच काढायला नको! साहित्यसंस्थांची मुखपत्रे आणि *अनुष्टुभ*सारखे एखादे नियतकालिक वगळता, मराठीत वाङ्मयीन नियतकालिक नाही. वृत्तपत्रांच्या पुरवण्यांतून प्रसिद्ध होणाऱ्या जुजबी परीक्षणांपलीकडे मराठी समीक्षा नाही. याचा अर्थ असा की, मराठीत वाङ्मयाभ्यासाची परंपरा आपण निर्माण करू शकलो नाही.

महाराष्ट्रात कोशकर्त्यांची केवढी मोठी परंपरा होती. परंतु आज मराठी भाषा व वाङ्मय यासंबंधीचे कोश तयार करायला तज्ज्ञ अभ्यासक मिळत नाहीत. साहित्य-संस्कृती मंडळाचा वाङ्मयकोश तयार करता करता आम्हाला धाप लागली आहे. याच मंडळाच्या मराठी शब्दकोशासाठी तज्ज्ञ मिळत नसल्यामुळे तो वर्षानुवर्षे रखडतो आहे. दात्यांच्या वाङ्मयसूचीचे आणि नियतकालिकांच्या सूचीचे पुढील खंड तयार करायला माणसे कोठे आहेत? भाषा व वाङ्मय या क्षेत्रातील अभ्यासाबद्दल जर अशीच नकारघंटा वाजवावी लागत असेल तर नऊ विद्यापीठे, शेकडो महाविद्यालये आणि हजारो शाळा यांवर होणाऱ्या खर्चाचे नेमके फलित काय, असा प्रश्न उपस्थित होतो.

मराठी अध्ययन-अध्यापनापेक्षाही मराठी माध्यमाची आजची अवस्था वाईट आहे. शहरातला विद्यार्थी तर इंग्रजी माध्यमाकडे वळला आहेच; पण इंग्रजी माध्यमाचे हे लोण आता खेड्या-पाड्यांपर्यंत पोचू लागले आहे. मराठी माध्यमातून शालेय पातळीवर आज जे शिक्षण मिळते त्याचा दर्जा तरी बरा आहे. परंतु महाविद्यालयीन पातळीवरील मराठी माध्यमाची आजची परिस्थिती चिंताजनक आहे. मुंबई-पुण्यासारख्या मोठ्या शहरांतील महाविद्यालये सोडली तर सर्वच मानव्यविद्या व सामाजिक शास्त्रे या ज्ञानक्षेत्रांचे शिक्षण सामान्यपणे मराठी माध्यमातून दिले जाते. या विद्यार्थ्यांना मराठीतून चांगली प्रमाणित पाठ्यपुस्तके आणि संदर्भग्रंथ उपलब्ध नाहीत. हे विद्यार्थी मराठीत लिहिलेली गाइडे वाचून पदवीपर्यंतचे आणि पदव्युत्तर शिक्षण पूर्ण करतात. आपली परीक्षापद्धतीही अशी की, केवळ गाइडांच्या आधारे दिलेल्या परीक्षांत ते चांगले गुण मिळवून उत्तीर्णही होतात. परीक्षांसाठी वाचल्या जाणाऱ्या गाइडांचा दर्जा काय. गाईडलेखकांचे त्या विषयातील ज्ञान कितपत अचूक आणि अद्ययावत आहे, या प्रश्नांची नकारार्थी उत्तरे मिळण्याची शक्यता आहे. अशा गाइडांच्या अभ्यासातून बाहेर पडलेल्या पदवीधरांपैकी काहीजण प्राध्यापक होतात आणि गाइडांपासून त्यांनी मिळवलेल्या ज्ञानावर ते नवे विद्यार्थी घडवू लागतात.

अशा प्रकारे विद्यापीठीय शिक्षणातून बाहेर पडणारे विद्यार्थी जागतिक स्पर्धेच्या युगात कितपत टिकाव धरू शकणार, ते ज्ञानक्षेत्रात आणि राजकारणासहित विविध जीवनक्षेत्रांत किती समर्थ नेतृत्व देऊ शकणार, भावी काळातील समाजव्यवस्थेवर याचे कोणते परिणाम होणार, असे अस्वस्थ करणारे अनेक प्रश्न या संदर्भात निर्माण होतात.

महाराष्ट्र राज्य-स्थापनेनंतर मराठी माध्यमाच्या विद्यार्थ्यांसाठी दर्जेदार पुस्तके तयार करण्याच्या हेतूने विद्यापीठ पाठ्यपुस्तक निर्मितिमंडळ अस्तित्वात आले. सामाजिक शास्त्रांची पदवीपातळीवरची अनेक चांगली पुस्तके या मंडळाने प्रसिद्ध केली. परंतु पुढे ह्या मंडळाचे कार्य पूर्णतः थंडावले. महाराष्ट्रातील










ग्रामीण भागात आणि अर्धग्रामीण भागात जर आजही सामाजिक शास्त्रांचे शिक्षण मराठीतून दिले जात असेल तर पाठ्य-पुस्तक निर्मितिमंडळाचा कारभार महाराष्ट्र शासनाने का गुंडाळला, असा प्रश्न पडतो.

परवापर्यंत शालेय पातळीवरचे विज्ञानाचे शिक्षण मराठीतून दिले जात होते. आता विज्ञान आणि गणित या विषयांचे शिक्षण वाढत्या प्रमाणात इंग्रजीतून दिले जाऊ लागले आहे. विज्ञानाच्या शिक्षणासाठी महाविद्यालयीन पातळीवर मराठीला प्रवेशबंदी होती. आता ही बंदी शालेयपातळीवरही लागू होण्याचा काळ जवळ आला आहे. मानव्य विद्या, सामाजिक शास्त्रे आणि वाणिज्य या क्षेत्रांत आपण मराठी माध्यमाचे असे धिंडवडे काढलेत आणि विद्यार्थ्यांची अशी कोंडी करून टाकलीय, की त्यांना इंग्रजी माध्यमाकडे वळण्यावाचून गत्यंतर असू नये.

आपल्याला आपल्या भाषेतून ज्ञान मिळत नाही, ज्ञानभाषा म्हणून आपल्यावर इंग्रजी भाषा लादली जात आहे याची खंत आपल्याला स्वातंत्र्यपूर्व काळात होती. आपली भाषा, आपली संस्कृती परकीय आक्रमणापासून वाचवली पाहिजे; किंबहुना त्यांचे संवर्धनही आपणच केले पाहिजे, असे त्या काळात आपल्याला वाटत होते. त्यासाठी आपण देशी भाषांमधून शिक्षण देणारी राष्ट्रीय विद्यालये आणि विद्यापीठे स्थापन करण्याचे प्रयत्न केले. आपापली उपजीविकेची क्षेत्रे सांभाळून फावल्या वेळात स्वभाषा, स्वसंस्कृती यांचा अभ्यास करणारे कितीतरी संशोधक महाराष्ट्रात निर्माण झाले. स्वभाषा व स्वसंस्कृती यांचा विकास करणे हा आपल्या स्वातंत्र्यलढ्याचा भाग होता. पारतंत्र्य हाच यांच्या विकासातील मोठा अडथळा आहे, असा आपला विश्वास होता. स्वातंत्र्य मिळाल्यामिळाल्या स्वभाषेच्या विकासाचे प्रयत्न त्यामुळेच सुरू झाले. देशी भाषांतून शालेय शिक्षण देणे, देशी भाषांतून शासकीय कारभार करणे, भाषावार प्रांतरचना करणे यांसारख्या गोष्टी सुरुवातीला घडल्या अगर घडण्यास प्रारंभ झाला. महाराष्ट्रात मराठी हे शिक्षणाचे माध्यम म्हणून प्रथम शालेय पातळीवर व नंतर विद्यापीठीय पातळीवर स्वीकारले गेले. मराठी भाषा व संस्कृती यांच्या संवर्धनार्थ साहित्य-संस्कृती मंडळ, विद्यापीठ पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ, भाषा संचालनालय या संस्था स्थापन झाल्या. विविध ज्ञानशास्त्रांतील मराठी पाठ्यपुस्तके तयार होऊ लागली. भाषा संचालनालयामार्फत वेगवेगळ्या विषयांच्या पारिभाषिक संज्ञा तयार करण्याचे कार्य सुरू झाले. मराठी विश्वकोश निर्माण होऊ लागला. परंतु मराठी-विकासाची कामे हळूहळू थंडावत गेली. विशेषतः शिक्षणाच्या क्षेत्रात मराठी भाषेच्या विकासाचे कार्य जवळपास बंद झाले. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर आपण जीवनपद्धतीचा जो साचा स्वीकारला त्यात इंग्रजी भाषा अटळ असल्याचे आपल्याला जाणवले आणि स्वातंत्र्यपूर्वकाळात इंग्रजी भाषेला आपला जो विरोध होता तो मावळत गेला. आपण स्वखुषीने इंग्रजी भाषेला मिठी मारायला पुढे सरसावलो. गेल्या चाळीस वर्षांत आपल्या भाषाविषयक भूमिका पूर्णपणे बदलल्या.

हे असे झाले याचे मुख्य कारण म्हणजे मराठी भाषेवरचे आपले प्रेम प्रतिक्रियात्मक, सापेक्ष आणि नकारात्मक स्वरूपाचे होते. वस्तुतः स्वभाषा व स्वसंस्कृती यांच्यावरील प्रेमाच्या भावनेला एक होकारात्मक बाजूही होती. आपल्या संस्कृतीतील सबळ गोष्टी टिकवून तिच्यात आधुनिकता मुरवण्याची एक प्रेरणा गतशतकात निर्माण झाली होती. परंतु स्वातंत्र्यप्राप्तीनंतर ती फुललीच नाही. "आता आपण स्वतंत्र झालो आहोत, आपल्या भाषेचा आणि संस्कृतीचा विकास साधून आणि त्यांचे आधुनिकीकरण करून आपण प्रगत देशांच्या पंगतीत बरोबरीच्या नात्याने बसले पाहिजे, त्यासाठी अमाप कष्ट केले पाहिजेत, इष्ट तो त्यागही केला पाहिजे." – असा विधायक विचार आपल्यात रुजला नाही.

स्वातंत्र्यलढ्यातील आपले नेतृत्वही ब्रिटिश संस्कृतीच्या प्रभावाखाली होते. (याला म. गांधी हा एकमेव अपवाद) पं. जवाहरलाल नेहरू हे या नेतृत्वाचे अग्रणी; त्यांच्याच हाती सूत्रे आली. त्यांना ब्रिटिश लोकशाही, मूल्यव्यवस्था, प्रशासन, न्यायव्यवस्था या सर्व गोष्टी योग्य वाटत होत्या. भारताला स्वतःची मूल्यव्यवस्था आहे, स्वतःची जीवनपद्धती आहे, त्याच्या स्वतःच्या खास गरजा आहेत, त्याची स्वतःची उद्दिष्टे आहेत आणि केवळ त्याच्याच अशा समस्याही आहेत. या सर्व गोष्टींना विचारात घेऊन राज्यघटना, प्रशासन, न्यायव्यवस्था या सर्वांची मुळातून नव्याने मांडणी करायला हवी होती. परंतु आपल्या नेतृत्वाने ब्रिटिशांनी त्यांच्या गरजांच्या उद्दिष्टातून भारतात घालून दिलेली घडी आपण जराही विस्कटू न देता जशीच्या तशी स्वीकारली. इंग्रजांच्या मूल्यव्यवस्थेचा, प्रशासनाचा, रीतीरिवाजांचा वारसा आपल्याला सुदैवाने लाभला आहे, तो आपण टिकवला पाहिजे, असा विचार यामागे होता. यामुळे

इंग्रजी भाषेचे स्तोम कायम राहिले, आणि हळूहळू वाढतही गेले. आपल्या राजकीय नेतृत्वाने आपण मिळवलेल्या स्वातंत्र्याला 'सत्तांतरा'चा दर्जा दिला. त्यांनी केवळ राज्यकर्ते बदलवले; राज्य बदलवले नाही.

शिक्षण हे माणसाच्या जगण्याचा एक भागच आहे. आपल्याला प्राप्त झालेल्या शिक्षणाचे, ज्ञानाचे उपयोजन करीत आपण आपले जगणे अर्थपूर्ण, चांगले आणि समृद्ध करीत असतो. हे ज्ञानाचे उपयोजन आपण भाषेच्या माध्यमातून करीत असतो. त्यासाठी आपल्या जीवनव्यवहारांची भाषा आणि शिक्षणाची भाषा एकच असावी लागते. ज्या भाषेत आपण शिकतो त्याच भाषेत जर आपले सर्व जीवनव्यवहार होत असतील तरच आपण आपल्या जगण्याला अर्थपूर्ण, चांगले आणि समृद्ध बनवण्यासाठी आपल्या ज्ञानाचे सहजपणे उपयोजन करू शकतो. अशा या उपयोजनातून आपली भाषा समृद्ध होत जाते. जगताना विविध जीवनव्यवहारांत नवनव्या समस्या निर्माण होत असतात. त्या सोडवताना आपण आपल्या भाषेतच ज्ञाननिर्मिती करू लागतो. त्यामुळे आपल्या भाषेला ज्ञाननिर्मितीची क्षमता प्राप्त होते. ती पूर्णपणे "ज्ञानभाषा" बनते. एखादी भाषा शिक्षणाचे माध्यम बनल्यामुळे ज्ञानभाषा होत नसते. ज्ञानभाषा होण्यासाठी ती शिक्षणाचे माध्यम असणे आवश्यकच असते. परंतु भाषा जेव्हा ज्ञान प्रसवू लागते तेव्हाच ती ज्ञानभाषा होते. मराठी जर ज्ञानभाषा व्हायची असेल तर ज्या मराठीत बालपणापासून आपल्या प्राथमिक संकल्पनांची जडणघडण होते त्याच मराठीत आपले रीतसर, औपचारिक शिक्षण झाले पाहिजे. आणि त्याच मराठी भाषेत त्याचे आर्थिक, औद्योगिक, राजकीय, शासकीय आणि दैनंदिन व्यवहार झाले पाहिजेत. तरच तो या सर्व प्रकारच्या व्यवहारांत आपल्या ज्ञानाचे नीट उपयोजन करू शकेल. ज्ञान, विद्या, कला या सर्व क्षेत्रांत तो मूलभूत निर्मिती करू शकेल.

महाराष्ट्राच्या भाषिक व्यवहारांचा नकाशा आपण पाहिला तर, जन्मल्यानंतर जगाची प्राथमिक ओळख होण्याची आणि परिचितांतील भावनिक आणि व्यावहारिक देवाण-घेवाणीची भाषा मराठी, मोठ्या शहरांतील बाजारातील व्यवहारांची भाषा हिंदी, उद्योगधंदे, आर्थिक संस्था, न्यायसंस्था, उपजीविकेशी संलग्न व्यवहार यांची भाषा इंग्रजी, महाराष्ट्राच्या शासन-व्यवहाराची भाषा मराठी व इंग्रजी, भारताच्या केंद्रीय शासन-व्यवहाराची भाषा हिंदी व इंग्रजी, महाराष्ट्रातील करमणुकीच्या व्यवहारांची भाषा प्रामुख्याने हिंदी असा महाराष्ट्राच्या नागरी भागाच्या भाषिक व्यवहारांचा नकाशा आहे. मराठी माणसाच्या प्राथमिक संकल्पनांची जडणघडण मराठीतून होत असली, तो मराठीतून विचार करीत असला तरी, मराठी माणसाला जगताना आयुष्यभर भाषांतर करीत जगावे लागते. उपजीविकेसाठी तो जो व्यवसाय निवडतो त्या व्यवसायाची इंग्रजी भाषा तो नैपुण्याने वापरतो; पण त्याचा अर्थ तो इंग्रजीत विचार करतो असा होत नाही. त्यामुळे व्यवसायासाठी आणि व्यवसायापुरता इंग्रजीचा वापर करणारा मराठी माणूस आपल्या व्यवसायातील समस्या सोडविण्यासाठी नवी ज्ञाननिर्मिती करू शकत नाही. मग व्यवसायाच्या पारंपरिक पद्धती, गैरसोयीच्या वाटल्या तरी, पाळत राहणे एवढेच फक्त तो करू शकतो. आपली कार्यालये, न्यायसंस्था यांमध्ये गेल्या पन्नास वर्षांत किती बदल झाला? गैरसोयीच्या गोष्टी काढून टाकण्यात आपण किती यशस्वी झालो? या प्रश्नाचे नकारार्थी उत्तर आपणांस द्यावे लागते. याचा अर्थ असा की, इंग्रजी माध्यमातून शिकणारे लोक इंग्रजी भाषेतून चालणारे व्यवहार, आहे त्या पद्धतीने सुरळीतपणे करू शकत असले तरी या व्यवहारांत नवनिर्मिती करून त्यांना समृद्ध करू शकत नाहीत. नवनिर्मितीच्या सुप्त क्षमता असलेल्या मातृभाषेचा वापर प्रत्यक्ष जीवनव्यवहारात अत्यल्प असल्यामुळे या सुप्त क्षमतेला अंकुर फुटू शकत नाहीत. त्यामुळे त्याचे हे जीवनव्यवहार यांत्रिक बनतात आणि तो आयुष्यभर परकेपण अनुभवीत राहतो. या सर्वांचा परिणाम त्याच्या एकूण निर्मितिक्षमतेवर होत असल्यामुळे त्याची वाङ्मयनिर्मितीही क्षीण बनून जाते. इंग्रजी राजवटीपासूनचे मराठी वाङ्मय तुलनेने सामान्य आहे याच्या अनेक कारणांपैकी हेही एक कारण आहे. जेव्हा निर्मितीची भाषा आणि जगण्याची भाषा भिन्न भिन्न असतात तेव्हा निर्मितीच्या भाषेत नीट निर्मिती होत नसते आणि परक्या भाषेतून जगणेही नीट होत नसते.

मूठभर शहरी लोकांनी जरी मराठीचा वापर कमी केला असला तरी ग्रामीण भागातील मराठी जनता मराठी भाषा जगवील, वाढवील; तेव्हा मराठीच्या भवितव्याची चिंता करणे हे अनाठायी भयग्रस्त होण्याचे लक्षण आहे. असा एक युक्तिवाद केला जातो. आज ग्रामीण महाराष्ट्रातील अशिक्षित व साक्षर समाजाचे सर्व व्यवहार मराठीतून चालतात ही गोष्ट खरी. परंतु या व्यवहारांच्या कक्षेचा व्यास छोटा, पारंपरिक व

मागासलेला आहे. या व्यवहारांचे जेव्हा आधुनिकीकरण होऊ लागते तेव्हा, ते हिंदी-इंग्रजीतूनच होते. शहरांसाठी व्यवहारांची जी भाषिक यंत्रणा प्रस्थापित झाली तीच उद्याच्या आधुनिक ग्रामीण भागात वापरली जाणार, हे अटळ आहे. म्हणजे आजच्या नागरी भागाची जी अवस्था आहे तीच उद्याच्या ग्रामीण भागाचीही असणार आहे.

मातृभाषा हे ज्ञानप्राप्तीचे नैसर्गिक माध्यम असते; मातृभाषेतून ज्ञानग्रहणाची क्रिया सुरळीत, विनासायास होते; हा युक्तिवाद सर्वमान्य आणि सर्वज्ञात आहे. परंतु मातृभाषा हीच सर्जनक्षम असते ही बाब मात्र सामान्यपणे दुर्लक्षिली जाते. त्यामुळे मातृभाषा हे ज्ञानप्राप्तीचे आणि ज्ञाननिर्मितीचे केवळ एकमेव माध्यम आहे आणि या माध्यमाला अन्य पर्याय नाही हे लक्षात घेतले जात नाही. मातृभाषा सोडून परकी भाषा माध्यम म्हणून स्वीकारणे हे व्यक्तिविकासाच्या आणि एकूण संस्कृतिधारणेच्या दृष्टीने किती घातक आहे हे म्हणूनच लक्षात घेतले जात नाही. आपल्या भोवतालच्या परिसराचा अर्थ लावणे, त्यातील संगतीचा शोध घेणे, त्यामागील नियामक तत्त्वे शोधून काढणे या नैसर्गिक मानवी वृत्तीतून व्यक्तीच्या संकल्पना घडत जातात. घडलेल्या या संकल्पनांच्या आधारे तो या परिसरात निर्माण होणाऱ्या परिस्थितीचा अन्वयार्थ लावतो. तो लावताना त्याच्या प्रस्थापित संकल्पना वदलू शकतात आणि नव्या संकल्पना घडल्या जाऊ शकतात.

आपल्या गरजा आणि उद्दिष्टे यांनुरूप परिस्थिती घडवण्यासाठी तो नवनव्या संकल्पनांची निर्मिती करतो व त्याआधारे अनुकूल परिस्थिती प्राप्त करून घेतो. या संपूर्ण प्रक्रियेला आपण ज्ञानप्रक्रिया म्हणतो. व्यक्ती ज्या परिसरात लहानाची मोठी होते, त्या परिसराच्या भाषेत ही प्रक्रिया घडत असते. आज आपल्या ज्ञानप्रक्रियेची मूलभूत भाषा (मराठी), शिक्षणाची भाषा (इंग्रजी), आणि महत्त्वाच्या जीवनव्यवहाराची भाषा (इंग्रजी-हिंदी) या तिन्ही भाषा भिन्न असल्यामुळे आपल्या नेहमीच्या जगण्यातून आपल्याला ज्ञानप्राप्ती होत नाही आणि आपल्या हातून ज्ञाननिर्मितीही होत नाही. परक्या भाषेतून जे ज्ञान आपण मिळवतो ते आपल्या जगण्याला अर्थपूर्ण बनवत नाही आणि जे आपल्या जगण्यातील समस्या सोडवण्यासाठी नवसंकल्पनांची निर्मितीही करीत नाही. त्यामुळे आपले जगणे आणि आपले ज्ञान यांत अर्थपूर्ण नातेच निर्माण होत नाही. मग झाले आहे असे की, ज्ञान पाश्चिमात्त्यांनी निर्माण करायचे आणि आपण फक्त त्याची माहिती मिळवायची; नवनवी उत्पादनतंत्रे त्यांनी घडवायची आणि आयात करून ती आपल्याकडे वापरायची. असा प्रकार सतत चालू राहतो. आपल्याकडे ज्यांना विद्वान म्हटले जाते ते ज्ञाननिर्माते नसतात तर केवळ 'माहितगार' असतात. आपली विद्यापीठेही ज्ञाननिर्मितीची नव्हे तर माहितीवितरणाची केंद्रे झाली आहेत. आधुनिक विज्ञानाच्या आणि सामाजिक शास्त्रांच्या विश्वात आपले स्थान परप्रकाशी उपग्रहाचे झाले आहे. आधुनिक ज्ञानक्षेत्रात जर आपण मोलाची भर घालीत गेलो तरच या क्षेत्रातील आपले "दुय्यम नागरिकत्व" नाहीसे होईल. आणि आपण या ज्ञानविश्वाचे सन्माननीय नागरिक होऊ शकू. दुर्दैव असे की, स्वातंत्र्यप्राप्तीनंतर आवश्यक असलेले शैक्षणिक धोरण आपल्या नेतृत्वाने आखले नाही.

देशी भाषांना ज्ञानभाषांचा दर्जा प्राप्त करून देण्याचा मार्ग कष्टाचा, त्यागाचा होता. या मार्गाने जर आपण गेलो असतो तर कदाचित ज्ञानक्षेत्रात आपण आहोत त्यापेक्षा काही दशके मागे गेलो असतो. कदाचित, यामुळे, ज्ञानक्षेत्रात काही काळ अराजकही निर्माण झाले असते. पण आपल्या भाषा "ज्ञानभाषा" या स्तरावर पोचल्यानंतर आपण हे मागासलेपण चटकन भरून काढले असते आणि आपला देश ज्ञानक्षेत्रात स्वयंप्रकाशाने उजळून निघाला असता. परंतु हे झाले नाही याचे आणखी एक कारण असे की, इंग्रजी राजवटीने आपल्या अस्मितेचे व आत्मविश्वासाचे खच्चीकरण करून टाकले होते. इंग्रजी भाषेच्या आणि संस्कृतीच्या कुबड्या टाकून आपण आपल्या पायाने चालू शकतो हा विश्वास आपल्या नेतृत्वाने गमावला होता. (याला फक्त म. गांधींचा अपवाद). त्यात आधुनिक युगात प्रवेश करण्याची आपल्याला घाई झाली होती. अद्ययावत व आधुनिक विज्ञान तात्काळ अवगत केल्याशिवाय आपला देश प्रगती करू शकणार नाही, आणि असे ज्ञान ज्या इंग्रजी भाषेत उपलब्ध आहे तिच्यावर आपले आयतेच प्रभुत्व असल्यामुळे हे ज्ञान आपणांस विनासायास प्राप्त होऊ शकते; तेव्हा हे ज्ञान इंग्रजीतून मिळवण्याची आपली परंपरा कायम ठेवावी; हे सर्व ज्ञान देशी भाषांत आणून विद्यार्थी घडविण्याचा मार्ग वेळखाऊपणाचा असल्याने त्याचा अवलंब केल्यास आपल्या प्रगतीला खीळ बसेल; हा विचार स्वातंत्र्यप्राप्तीनंतर बळावला.

मग गुलामगिरीच्या दीडशे वर्षांच्या काळात देशी भाषांच्या विकासाचे जे स्वप्न आपण पाहात आलो त्याचे काय करायचे? ते टाकून द्यायचे नाही; त्यासाठी आपण टप्प्याटप्प्याने, आस्तेकदम जायला हवे; प्रथम शालेय शिक्षण देशी भाषांतून देऊ, नंतर महाविद्यालयीन क्षेत्रात देशी भाषांचा विस्तार करू; त्यातही प्रथम सामाजिक शास्त्रांचे शिक्षण व शेवटी भौतिक-नैसर्गिक शास्त्राचे शिक्षण देशी भाषांतून देऊ; हे घडेपर्यंत आपल्या भाषांचे सामर्थ्यही वाढेल आणि देशी भाषा या ज्ञानभाषा बनवण्याची क्रिया सोपी होऊन जाईल; या विचारानुसार आपले माध्यमविषयक धोरण ठरले. हे सर्व घडेपर्यंत मध्यतंरीच्या काळात उद्योगधंदे, व्यापार, आर्थिक संस्था या सर्व क्षेत्रांत इंग्रजी अधिकाधिक बळावत गेली. या क्षेत्रात देशी भाषांचा शिरकाव झालाच नाही. प्रांतिक प्रशासनात कूर्मगतीने देशीभाषाकरण होऊ लागले. तेथेही आणि केंद्रीय प्रशासनातही इंग्रजी चालूच राहिले. शासकीय व्यवहारात देशी भाषा चोरासारख्या अंग चोरून वावरायला लागल्या. त्यांना मालकिणीची प्रतिष्ठा कधी लाभलीच नाही. एकीकडे इंग्रजीची अपरिहार्यता प्रस्थापित होत गेली आणि दुसरीकडे देशी भाषांमधून टप्प्याटप्प्याने शिक्षण दिले जाऊ लागले. शेवटी उपजीविकेसाठी कोणताही प्रतिष्ठित व्यवहार करायचा असेल तर इंग्रजीशिवाय अन्य पर्याय नाही याचे स्पष्ट भान समाजास आले. हे जे घडले त्याला आपले चुकीचे धोरणच जबाबदार आहे. खाजगी उद्योगधंद्यांपासून सर्व प्रकारचे व्यवहार प्रत्येक प्रांतात त्या प्रांताच्या भाषेतच होतील, ही भूमिका स्वीकारून शिक्षणात देशी भाषा माध्यम म्हणून आणणे आवश्यक होते. पण असा विचार केला गेला नाही. यामागेही राष्ट्रवादाच्या चुकीच्या समजुती होत्या.

शिक्षणाचे माध्यम म्हणून देशी भाषा स्वीकारण्यात जे 'आस्तेकदम' धोरण अवलंबिले गेले त्यामागे देशी भाषांत पारिभाषिक संज्ञांच्या अभावाचे मुख्य कारण दिले जात होते. या पारिभाषिक संज्ञा देशी भाषांच्या शब्दसंपत्तीतून आणि प्रामुख्याने संस्कृत-भाषेतून घडवण्याचे प्रयत्न इंग्रजी राजवटीपासून सुरू होते. पारिभाषिक संज्ञा संस्कृतमधून घेण्यामागे राष्ट्रवादाच्या, सांस्कृतिक अस्मितेच्या, भाषाशुद्धीच्या कल्पना होत्या. स्वातंत्र्य-प्राप्तीनंतर शालेय अभ्यासातून संस्कृतचे महत्त्व कमी होत गेले. संस्कृत भाषेवर प्रभुत्व असणारे विविध ज्ञानशाखांचे तज्ज्ञ दुर्मिळ होत गेले. त्यामुळे वेगवेगळ्या ज्ञानशाखांमध्ये संस्कृतमधून पारिभाषिक संज्ञा आणण्याची प्रक्रिया जवळपास थांबली. खरे म्हणजे पारिभाषिक संज्ञांसाठी संस्कृतकडे जाण्याची गरज नव्हती. मराठी भाषा ही जर स्वतंत्र भाषा असेल तर तिला संस्कृत शब्दही इंग्रजी शब्दांइतके परके आहेत, असे म्हणायला हवे. या शतकात विज्ञानाचा प्रचंड स्फोट होऊन सर्व विज्ञानशाखांची स्वनातीत गतीने वाढ होत आहे. त्यामुळे सर्वच विज्ञानशाखांमध्ये दररोज नवनव्या संज्ञांची भर पडत आहे. अशा परिस्थितीत प्रत्येक संज्ञेसाठी मराठी-संस्कृत पर्याय शोधायचे ठरवले तर ती गोष्ट अशक्य कोटीतील आहे. यावर व्यावहारिक उपाय म्हणजे इंग्रजी पारिभाषिक संज्ञा स्वीकारून त्यांचाच वापर मराठी वैज्ञानिक लेखनात करायचा, हा ठरू शकेल. कुठलाही शब्द हा मूलतः उच्चार असतो; ती केवळ ध्वनिरचना असते. विशिष्ट ध्वनिरचनेचा सार्थ असा वापर जेव्हा एखाद्या भाषेत होत जातो तेव्हा ती ध्वनिरचना त्या भाषेतला शब्द बनते. प्रत्येक भाषेला आपली स्वतःची उच्चारपद्धती असते. तिच्या चौकटीतच प्रत्येक भाषा नव्या ध्वनिरचना, नवे शब्द घडवीत असते. एखादी भाषा जेव्हा परभाषेतील ध्वनिरचना शब्द म्हणून स्वीकारते तेव्हा त्या परक्या ध्वनिरचनेला आपल्या उच्चारपद्धतीच्या चौकटीत बसवू पाहते. असे परके शब्द त्या भाषेच्या उच्चारपद्धतीत बसले की, ते त्या भाषेचे शब्द बनून जातात. असे स्वीकृत शब्द त्या भाषेच्या सांस्कृतिक पर्यावरणात वापरले जाऊ लागले की, त्यांच्या भोवती त्या संस्कृतीची अर्थवलये तयार होऊ लागतात आणि तो शब्द त्या भाषेचा होतो. अशा परकीय शब्दांना त्या भाषेच्या व्याकरणाचे नियम लावून त्यांची विविध रूपे बनवली जातात. गत शतकात या प्रकारे कितीतरी इंग्रजी शब्द 'मराठी' बनले. आपण जर इंग्रजी पारिभाषिक संज्ञा स्वीकारीत गेलो तर हळूहळू त्यांचे उच्चार मराठी वळणाचे होतील आणि मराठी व्याकरण लावून जर आपण या संज्ञांची वेगवेगळी रूपे तयार करू लागलो तर त्या पूर्णतः मराठी बनून जातील. त्यातील काही नेहमीच्या बोलण्यात रुळतील. त्यांच्याभोवती मराठी संस्कृतीची अर्थवलये तयार होतील आणि आपली भाषा संपन्न होईल. तेव्हा मराठी भाषा ही ज्ञानदानाचे माध्यम बनवताना "पारिभाषिक संज्ञांचा अभाव" हा फारसा गंभीर मुद्दा होत नाही.

आधुनिक विज्ञानप्रणीत संस्कृतीत एक महत्त्वाचे वाटेकरी म्हणून जर आपल्याला स्थान मिळवायचे असेल तर भारतातील सर्व महत्त्वाच्या भाषा ज्ञानभाषा झाल्या पाहिजेत. महाराष्ट्रापुरते

(पान क्र. १० वर पुढे चालू.....)






# भाषा, जीवन आणि विचार यांचा परस्पसंबंध

मे.पुं. रेगे

महाराष्ट्रीय म्हणून आपण सर्वांनी आनंद मानायला हरकत नाही की, आधुनिक मराठी ललित साहित्य हे आता सुस्थिर झालेलं आहे. ह्या स्वरूपाचं साहित्य दीडशे वर्षांपूर्वी आपल्याकडे नव्हतं. महाराष्ट्रीय समाजाने केलेली ही एक नवीन निर्मिती आहे. ते सुस्थिर झालं आहे असं मी म्हणतो याचं कारण, आधुनिक मराठी ललित साहित्याची एक परंपरा आता रूढ झाली आहे. परंपरा असण्याचा अर्थ असा : जेव्हा नवे लेखक, कवी, नाटककार, कादंबरीकार येतात तेव्हा त्यांचं जुन्यांशी नातं असतं. हे नातं, जरी ते विरोधाचं असलं तरी, उभयतांनाही कळत असतं. ललित साहित्याच्या क्षेत्रात अगोदर काय घडून गेलं आहे आणि त्यापेक्षा माझं लेखन कसं वेगळं आहे, त्याचा अनुवाद असला तर कोणत्या प्रकारे आहे आणि भिन्नता असली तर ती कुठे आहे, ह्याचं भान आज मराठी साहित्यिकांनाही आहे आणि रसिकांनाही आहे.

वैचारिक साहित्याच्या क्षेत्रात मात्र अशी परंपरा आधुनिक काळात मराठीत रूढ झालेली दिसत नाही. सबंध समाजाची एक वैचारिक निर्मिती अशा स्वरूपाचं स्थान मराठी साहित्याला महाराष्ट्राच्या जीवनात लाभलेलं नाही. असं का झालं, ह्याचं निदान करणं सोपं नाही.

हा फरक का पडला असावा? याचं एक कारण मला वाटतं ते असं की, आपल्याकडे ललित साहित्याच्या क्षेत्रात जी निर्मिती होते ती लोकांपुढे येते. आणि महाराष्ट्राचं आजचं जे मानस आहे त्यात त्या साहित्यिकांना स्थान मिळतं. पण समजा, महाराष्ट्रातला एक पहिल्या दर्जाचा अर्थशास्त्रज्ञ आहे, समाजशास्त्रज्ञ आहे – म्हणजे वैज्ञानिक भौतिकी किंवा शुद्ध गणित यांसारख्या सर्वसाधारण व्यवहारापासून दूर असलेल्या अतिशय ॲब्स्ट्रॅक्ट अशा विषयांविषयी मी बोलत नाही – सामाजिक जीवनाशी ज्याचा साक्षात संबंध आहे अशा सामाजिक शास्त्रांत ज्यांचं महत्त्वाचं योगदान आहे अशा माणसांचीसुद्धा, ती **मराठी माणसं** म्हणून ओळख महाराष्ट्रातल्या सुशिक्षित जनतेला नसते. याचं कारण असं की, त्या मंडळींचा जो श्रोतृवृंद आहे, तो स्वाभिविकच अखिल भारतीय आहे आणि त्याचं माध्यम इंग्रजी आहे. आणि त्या दर्जाची कामगिरी त्यांच्याकडून झाली तर त्यांचा संवाद आंतरराष्ट्रीय पातळीवर सुरू होतो आणि त्याचंही माध्यम इंग्रजीच आहे. याचा अर्थ असा : महाराष्ट्रातील वेगवेगळ्या विषयांच्या विचारवंतांनी सिद्ध केलेलं असं महाराष्ट्राचं वैचारिक साहित्य, आजच्या मराठी समाजाचे जे व्यावहारिक, सांस्कृतिक, औपपत्तिक असे वेगवेगळे प्रश्न आहेत त्याविषयीचं त्या विचारवंतांचं मराठीमध्ये प्रकट झालेलं चिंतन असं रूप मराठी वैचारिक साहित्याला आलेलं नाही.

जिथे स्वाभाविकपणे एखाद्या समाजाच्या संस्कृतीच्या एखाद्या अंगाचा विकास होत नाही तिथे काही वर्षं तरी, काही दशकं तरी, कृत्रिमपणे ह्या स्वरूपाचा विकास घडवून आणण्यासाठी प्रयत्न करावे लागतात. तसे प्रयत्न करणं आज आवश्यक आहे, असं मला वाटतं. याचा व्यावहारिक अर्थ असा – स्वतःच्या देशाचा त्याग न करता परदेशात स्थायिक होणं ह्यात जी अद्‌भुत किमया आहे तशीच किमया ह्या विचारवंतांनी आपापल्या क्षेत्रात दाखवावी. म्हणजे असं की, त्यांचा जो संवाद, चर्चा इंग्रजीतून अखिल भारतीय स्तरावर आणि आंतरराष्ट्रीय पातळीवर त्या त्या विषयांच्या अभ्यासकांशी चालू असते, तो संवाद, ती चर्चा मराठीत आली पाहिजे. अखिल भारतीय किंवा आंतरराष्ट्रीय पातळीवर चालणाऱ्या संवादाची, चर्चांची गरज आहे, त्याला मोल आहे; हे मान्य करूनही मला असं वाटतं की, ह्या विचारवंतांनी जाणीवपूर्वक मराठीत लिहिलं पाहिजे. या विचारवंतांना आपापल्या विषयांवर मराठीत लिहायला प्रवृत्त केलं पाहिजे. अशा स्वरूपाच्या लेखनाला आज एक स्वाभाविक वाचकवर्ग महाराष्ट्रात अस्तित्वात आलेला आहे. हा वाचकवर्ग म्हणजे सबंध ग्रामीण भागातून मराठी माध्यमातून पदवी किंवा पदव्युत्तर परीक्षा दिलेले बहुसंख्य

* वैचारिक साहित्यनिर्मितीच्या क्षेत्रातील कार्यासाठी महाराष्ट्र फाऊंडेशनतर्फेचा गौरव पुरस्कार १९९४ रोजी स्वीकारतेवेळी केलेल्या भाषणातील अंश *संवादिनी*, १९९५ वरून उद्‌धृत.






विद्यार्थी. हे विद्यार्थी इंग्रजीतून त्या त्या विषयाचं अध्ययन करू शकतील अशी परिस्थिती आज नाही. त्यामुळे चैतन्यशील अशा बौद्धिक जीवनाचा अनुभव त्यांना कधी आलेलाच नसतो. तो जर यायला हवा असेल तर त्याकरिता जाणीवपूर्वक असे प्रयत्न केले गेले पाहिजेत. असं झालं तर हळूहळू ह्या स्वरूपाचं साहित्य इथे स्थिरावेल.

आज झालं आहे ते असं, आणि मी हे वैषम्यानं बोलत नाही, परंतु मराठी भाषा ही ललित साहित्याचं माध्यम आहे अशी कल्पना आहे. आणि जिथे कुठेही अधिक गुंतागुंतीचा, खोलवर जाऊ पाहणारा असा विचार असेल तो मांडण्यासाठी अपरिहार्यपणे आपण सर्वजण किंवा आपल्यापैकी बहुतेक सर्वजण इंग्रजीचा आश्रय घेतो. आणि समजा, आपण उत्कट भाषाभिमानी असलो आणि त्यामुळे आपला विचार मराठीतूनच मांडायचा असं ठरवलं तर त्यातली फक्त क्रियापदं मराठी असतात आणि बाकीचे सर्व शब्द हे इंग्रजी पारिभाषिक किंवा व्यवहारातले शब्द असतात. आणि जर एखाद्या माणसानं, नीट समजावं म्हणून, साध्या सुलभ मराठीत लिहायचा अगदी जीव तोडून म्हणतात तसा प्रयत्न केला, फक्त जिथे विशिष्ट संकल्पना किंवा त्यांचं स्पष्टीकरण आहे तिथं पारिभाषिक शब्द किंवा ज्या प्रकारची भाषा वापरणं आवश्यक आहे त्या प्रकारची परिभाषा वापरली, तर लिखाण क्लिष्ट आहे, हा एक छाप त्याच्यावर बसतो.

वैचारिक साहित्याची परंपरा आपल्याकडे निर्माण झालीच नाही असं नाही. आधुनिक काळात पाश्चात्य संस्कृतीची धडक आपल्यावर बसल्यानंतर, जिचा गौरवानं उल्लेख केला जातो अशी वैचारिक परंपरा विष्णुबुवा ब्रह्मचारी, लोकहितवादी, जोतिबा फुले, रानडे, आगरकर, टिळक यांनी निर्माण केली होती. हे सर्व विचारवंत त्या काळात महाराष्ट्रापुढचे जे प्रश्न होते, सामाजिक, काही प्रमाणात आर्थिक, राजकीय, त्यांच्या-विषयीचं आपलं चिंतन-लेखन समाजाला जागृत करण्यासाठी करीत. ती त्यांची चैन नव्हती. किंवा ते ॲकॅडेमिक स्वरूपाचं कार्य नव्हतं. ते सामाजिक कार्य होतं. पण त्याचबरोबर वैचारिक होतं. आपण पाहा, टिळकांनंतर असं नाव आपण घेऊ शकत नाही. आंबेडकरांचं घेता येईल, पण आंबेडकर हे त्या परंपरेतीलच आहेत. योगायोगानं ते मागून आले असं म्हणता येईल. आता ह्यांना कोणी घडवलं होतं? तर, नवीन जे एक पाश्चात्य तत्त्वज्ञान, ज्या तत्त्वज्ञानाने आधुनिक स्वरूपाच्या समाजाची पायाभरणी केली, अनुभववाद, वैज्ञानिक विचारपद्धती यांचा, तसेच स्वातंत्र्य, समता, बंधुभाव ह्या प्रबोधनाच्या मूल्यांचा यथायोग्य आविष्कार कोणत्या प्रकारच्या जीवनात होईल ह्याचा विचार, हे सर्व जे चिंतन होतं त्याच्या पार्श्वभूमीवर, ते बऱ्याच प्रमाणात आत्मसात करून ही वैचारिक परंपरा महाराष्ट्रात विकसित झाली, हे आपल्याला माहीत आहे. पण पुढे गांधीवाद, मार्क्सवाद यांसारखे अत्यंत प्रभावी असे वैचारिक संप्रदाय विकसित झाले असूनही मराठीमध्ये त्यांचं प्रतिबिंब पडलं आहे असं आपल्याला दिसत नाही. हे का झालं असावं? याचं कारण मला वाटतं ते असं, ह्या प्रकारच्या विचाराला पायाभूत असं जे तत्त्वज्ञान होतं त्या तत्त्वज्ञानाची हेळसांड आपण केली. आता मी ज्यांची नावं घेतली ती फार मोठी नावं आहेत. पण आपण पाहा, त्यांच्यापैकी ज्याला दार्शनिक म्हणता येईल, फिलॉसॉफिकल म्हणता येईल त्या पातळीवर लेखन हे फारच थोड्यांनी केलं आहे आणि फार तुटपुंजेपणे केलं आहे. अशा दार्शनिक पातळीवरचं लिखाण एक रानड्यांत आढळेल आणि टिळकांत आढळेल. आगरकरांनी सुधारणांचा प्रचार केला हे खरं आहे आणि त्यांचा प्रामाणिकपणा हा निखळ होता, पारदर्शक होता. त्याचा प्रभाव आजूबाजूच्या लोकांवर आणि वाचकांवर पडला यात शंका नाही. पण ह्या नवीन तत्त्वज्ञानाचा जो सैद्धांतिक पाया होता त्याचं व्यवस्थित विवरण त्यांनी केलं नाही. ही हेळसांड आपण केली आणि त्यामुळे हा विचार सकस राहिला नाही, असं मला वाटतं.

तेव्हा आपण हे तत्त्वज्ञान आत्मसात केलं पाहिजे आणि ते नीट मराठी अभ्यासकांपुढे मांडलं पाहिजे. मिल् आणि स्पेन्सर या आधुनिक ऋषींच्या द्वारा जे ब्रिटिश तत्त्वज्ञान महाराष्ट्रात आलं होतं त्याची पाळंमुळं कुठे जातात, त्याची गृहीतकृत्यं काय आहेत, आक्षेप घेतले असता ती कितपत टिकून राहतात, ह्या सर्वांचा सुव्यवस्थित विचार आणि त्याची मांडणी आपल्याकडे झाली पाहिजे, हे एक. ह्याच पाश्चात्य वैचारिक परंपरेचा दुसरा जो महत्त्वाचा असा प्रवाह होता, कांट आणि त्याचे नंतरचे अनुयायी यांचा, ज्यांनी व्यक्तीची प्रतिष्ठा, स्वातंत्र्य, स्वायत्तता, समानता आणि न्याय या संकल्पनांना एक वेगळा आशय देऊन त्यांची सुव्यवस्थित अशी मांडणी केली, जिचा पुढे विकास आपल्याला हेगल आणि मार्क्स यांच्या तत्त्वज्ञानातून आढळतो. मी केवळ ॲकॅडेमिक तत्त्वज्ञान म्हणत नाही. प्रत्यक्ष सामाजिक व्यवहाराला जाऊन

भिडणारं, सामाजिक प्रश्न ओळखणारं, त्यांची मांडणी करून, त्यांची उत्तरं शोधणारं असं हे तत्त्वज्ञान मी म्हणतो. हा दुसरा प्रवाहही महाराष्ट्रात पूर्णपणे झाकोळला गेल्यासारखाच आहे. त्याच्यासंबंधीही काही लिखाण झालेलं नाही.

आपला जो भारतीय दर्शनांचा, शास्त्रांचा वैचारिक वारसा आहे, ज्याची परंपरा ब्रिटिश आल्यावर, ब्रिटिश अंमलामुळे कृत्रिमपणे खंडित झाली, ज्याचं माध्यम बऱ्याच प्रमाणात संस्कृत आणि काही प्रमाणात पाली, अर्धमागधी इत्यादी आपल्या अभिजात भाषा हे होतं, त्याच्यावर तर ही महाराष्ट्रीय संस्कृती आणि भारतीय संस्कृती आधारलेली आहे. ज्ञानेश्वरांची ज्ञानदेवी जर समजून घ्यायची तर प्रत्यभिज्ञादर्शन आलंच पाहिजे. परंतु संस्कृतावर पुरता काबू असल्याशिवाय आणि भारतीय दर्शनांचा चांगला अभ्यास असल्याशिवाय ज्ञानदेवी आणि प्रत्यभिज्ञा-दर्शन यांची नीट मांडणी आपल्याला करताच येणार नाही. आपल्या संस्कृतीचे हे सबंध अंग आपण जवळजवळ जाणूनबुजून दुर्लक्षित केलं आहे. असा एक काहीतरी छाप या परंपरेवर बसला आहे की, ही ब्राह्मणी आणि म्हणून प्रतिगामी परंपरा आहे. परंतु साळुंखे यांच्यासारख्या विद्वानांनी हे दाखवून दिलं आहे की ह्या सबंध भारतीय परंपरेचा फार मोठा अंश, घटक अब्राह्मणी आहे. आंबेडकरांनीसुद्धा सर्व आधुनिक मूल्यांवर समाज आधारला पाहिजे हे मान्य करूनही अखेरीस बौद्ध धम्माचा, ह्याच परंपरेतील एका धम्माचा आश्रय घेतला, ह्याचं मर्म आपण ओळखलं पाहिजे. ह्या संस्कृतीने आपल्याला घडवलेलं आहे आणि आपण 'आपण' म्हणून, 'आपले' म्हणून जगणार असू तर ह्या संस्कृतीला विसरून चालणार नाही. विश्वबंधुत्व हे मूल्य मोठं आहे. जिथे असेल तिथे प्रत्येकजण इतरांविषयी आस्था बाळगेल, बंधुभाव बाळगेल ते खरं आहे. पण प्रत्येकजण म्हणजे कोण? प्रत्येकजण वेगळा असला पाहिजे. He is to count as one. मग आपण म्हणजे कोण? तर भारतीय! म्हणजे कोण? तर ह्या सांस्कृतिक वारशानं घडविलेले ते आपण. हा वारसा जे नाकारतात त्यांच्याही रोमारोमांत तो भिनलेला असतो. फक्त त्याची जाणीव नसते. तेव्हा ही जाणीव करून घेऊन, ह्या वारशाचं चिकित्सक परीक्षण करून, त्यात काय ग्राह्य आहे आणि काय त्याज्य आहे हे ठरवून, हे तारतम्य बाळगून, त्याचा अभ्यास करीत राहणं म्हणजे आपल्या परंपरेवरची आपली पकड पुन्हा मजबूत करणं. ती जर आपण केली नाही तर आपण इतके विस्कळीत होऊ की सुट्या सुट्या व्यक्तींचा समुदाय, जो समाज होऊ शकत नाही, अशा तऱ्हेचं रूप ह्या महाराष्ट्राला आणि भारताला येऊ शकेल आणि ती एक भयावह अशी परिस्थिती असेल. म्हणून हे सर्व काम – हा एक अजेंडा आहे पाहा, ही एक कार्यक्रमपत्रिका आहे, – महाराष्ट्रात वैचारिक साहित्याविषयी ज्यांना आस्था आहे ते लेखक आणि त्यांचे संभाव्य वाचक, ह्यांनी हा कार्यक्रम आस्थेने हाती घेतला पाहिजे.

माझा शेवटचा मुद्दा असा – त्यासाठी वाईतला माझा अनुभव सांगतो. मी असं म्हटलं की, आपल्याकडे समाजशास्त्रज्ञ आहेत, अर्थशास्त्रज्ञ आहेत, इतिहासकार आहेत. ते चांगलं काम करतात. पण त्यांचा ऑडियन्स आणि ज्यांना उद्देशून ते हे सर्व करतात ते मूलतः इंग्रजी भाषा जाणणारे अन्य भारतीय आणि काही प्रमाणात जगातले त्या विषयांचे इतर अभ्यासक असे असतात. माझा वाईतला अनुभव असा : मी कृष्णेच्या काठी प्राज्ञपाठशाळामंडळात राहतो. कृष्णेच्या काठी म्हणण्यात यात अतिशयोक्ती नाही. खाली वाकून पाहिलं तर कृष्णेचा धरणानंतर जो काही प्रवाह उरला आहे तो तिथून दिसतो. तिथे मी रोज पाहतो तर लहान मुलांपासून म्हाताऱ्यांपर्यंत वेगवेगळ्या वयाची, काळीकुळकुळीत अशी काही माणसं फडकं घेऊन कृष्णेच्या त्या प्रवाहात अत्यंत कौशल्यानं मासे पकडत असतात. ती त्यांची दिवसाची फेरी असते. त्यांना किती मासे मिळतात ते मला माहीत नाही. ज्याअर्थी ते सातत्याने करीत राहातात त्या अर्थी करीत राहावं असं वाटावं एवढे तरी मासे त्यांना मिळत असणार. हे कोण लोक आहेत? ते वाईत आहेत. परंतु ते आहेत याचं भान वाईकरांना आहे असं मला वाटत नाही. त्यांची पालं असतात. रात्री दारू पिऊन आनंदात धिंगामस्ती करत असतात. सर्वतऱ्हेचे आवाज त्या दिशेने ऐकू येतात. तेवढीच त्यांच्या अस्तित्वाची एक निशाणी वाईकरांसाठी आहे, एरवी नाही. ते लोक असले तरी अदृश्य असल्यासारखे आहेत. असे हे आमचे, आमच्यातलेच लोक आणि त्यांना जर आपण असं वागवत असू तर हा आमचा एक समाज आहे असं म्हणवून घ्यायचा अधिकार तरी आपल्याला काय आहे? ते वास्तव नाही असा याचा अर्थ आहे. आमच्यातले जे समाजशास्त्रज्ञ आहेत ते ह्या माणसांचा अभ्यास करणार नाहीत, तर अमेरिकेत ज्या प्रकारची टूम समाजशास्त्रात निघाली असेल त्या प्रकारचं काम इथे भारतीय संदर्भात करणार. कारण आमचे डोळे तिथे आम्हांला जे यश मिळेल, जी मान्यता

मिळेल तिकडे लागलेले असतात. इंडस्ट्रीमध्ये, बिझनेसमध्ये असेल तसंच ज्ञानाच्या क्षेत्रातही आहे. आपण आपल्या समाजाकडे आपला चेहरा वळवला पाहिजे. त्याचं निरीक्षण केलं पाहिजे. आणि हे निरीक्षण करण्यासाठी तुम्हांला माणसांच्या अंतःकरणात जागा मिळवावी लागते. ह्या सर्व विचाराचं फलित म्हणजे ह्या माणसांच्या जगण्याच्या पद्धतीत सुधारणा होणं. ती सुधारणा म्हणजे अधिक चांगल्या रीतीनं जगता येणं ह्या स्वरूपाची असणं अधिक भौतिक समृद्धी आली की नाही हा प्रश्नच नाही. असं वळण आपल्या विचारवंतांना पडल्याशिवाय इथे खरा, जोमदार सामाजिक विचार विकसित होईल हे अशक्य आहे. तोपर्यंत आपण काय करू? आज जे होतं आहे ते करत राहू, की जी जी एक नवी बौद्धिक फॅशन फ्रान्समध्ये, इंग्लंडमध्ये आणि अमेरिकेमध्ये येईल तिचा अनुवाद आपण इथं मराठीत करू. पण ती मराठी वाक्यं अशी असतील की त्यांचा बोध कोणाला होणार नाही. कारण ते मूळ इंग्रज किंवा फ्रेंच काय म्हणत आहेत ह्याचं ज्ञान तुम्हांला असल्याशिवाय हा मराठी माणूस, ह्या मराठी वाक्यांद्वारा काय म्हणू पाहतो आहे ते तुम्हांला कळणार नाही. ही कृत्रिम आणि आपल्याला घातक अशी अवस्था आहे. हिच्यातून आपण अजून बाहेर पडू शकलेलो नाही. आणि आपण बाहेर पडू शकू ते केवळ आपल्या लोकांच्या साहाय्यानेच. तेव्हा आपल्याला आपलं खरं सत्त्व लाभेल. आणि विचारांना एक सामाजिक बैठक असेल, काही खरं चैतन्य असेल.



---

**(मराठीचे भवितव्य – पान क्र. ६ वरून पुढे चालू.....)**

बोलायचे तर येथील सर्व शाळांत, सर्व महाविद्यालयांत, सर्व विद्यापीठांत, सर्व संशोधन संस्थांत ज्ञानार्जन आणि ज्ञानवितरण केवळ मराठीत झाले पाहिजे. सर्व कारखान्यांत औद्योगिक, व्यापारविषयक कार्यालयांत सर्व व्यवहार मराठीत झाले पाहिजेत. सुरुवातीला ते अव्यावहारिक व अडचणीचे वाटत असले तरी ते अशक्य मात्र नाही. असे जर झाले तर मराठी आणि अन्य भारतीय भाषाही ज्ञाननिर्मिती करू लागतील आणि आजच्या ज्ञानाधिष्ठित संस्कृतीत आपणही एक सन्माननीय भागीदार होऊ शकू. परंतु इंग्रजीसारखी परभाषा जर माध्यम म्हणून राहिली तर ज्ञानक्षेत्रात आणि पर्यायाने सांस्कृतिक क्षेत्रात आपले स्थान केवळ दुय्यम राहील. एखादी भाषा "ज्ञानभाषा" बनवणे म्हणजे त्या भाषेत विद्यार्थ्यांना शिकवणे एवढा मर्यादित अर्थ आपण घेतला. त्यामुळे मराठी माध्यमाचा प्रयोग फसला. मराठी भाषा "ज्ञानभाषा" बनवणे याचा अर्थ मराठीतून सर्व ज्ञानशाखांचे अध्ययन-अध्यापन करणे, या ज्ञानशाखांचे ज्या ज्या जीवनव्यवहारांत उपयोजन होते त्या त्या जीवनव्यवहारांतही मराठीचा वापर करणे, असा होतो. दुर्दैवाने आपण हे लक्षात घेतले नाही.

कुठल्याही भाषेच्या अस्तित्वाला आणि विकासाला दोन गोष्टी आवश्यक असतात. एकाच भाषिक समाजाने एक सलग भूभाग व्यापलेला असणे आवश्यक असते आणि अशा भूभागातील सर्व जीवनव्यवहार त्या समाजाच्या भाषेतून होणे आवश्यक असते. भाषिक संस्कृतीच्या अस्तित्वाला आणि विकासाला आवश्यक असणाऱ्या ह्या प्राथमिक अटी आहेत. आज महाराष्ट्रातील शहरे ही बहुभाषिक आणि म्हणून हिंदी-इंग्रजीची बेटे होऊ लागली आहेत. आणि ती वाढत जाऊन मराठीभाषिकाच्या भूमिसलगतेला धोका निर्माण होऊ लागला आहे. तसेच महाराष्ट्रातील महत्त्वाचा जीवनव्यवहार हिंदी-इंग्रजीतून होऊ लागला असून मराठी भाषेचा वापर हळूहळू कौटुंबिक आणि वाङ्मयीन व्यवहारांपुरता सीमित होऊ लागला आहे. मराठी भाषेच्या अस्तित्वाला ही परिस्थिती पोषक नाही.

भारतात आणि पर्यायाने महाराष्ट्रात जर प्रांतीय भाषा आणि भाषिक संस्कृती टिकवायची असेल तर भारतात हिंदी, इंग्रजी आणि प्रांतीय भाषा यांचे संबंध आणि व्यवहारक्षेत्रे नव्याने निश्चित करावी लागतील. त्याच बरोबर भाषिक प्रांतांना अधिकाधिक स्वायत्तता द्यावी लागेल. आपला देश विविध स्वायत्त उपसंस्कृतींचा एक समूह आहे आणि तो तसा टिकवणे यात सर्वांचे हित आहे हे लक्षात घेऊन आपणांस सर्व शासकीय व राजकीय यंत्रणांची नव्याने रचना करावी लागेल. हे जर केले नाही तर प्रथम काही दुबळ्या भाषिक संस्कृती मरतील पण अंतिमतः यादवी होऊन हा देश विघटित होईल. सोविएत रशियाचा नजिकचा इतिहास या धोक्याची आपल्याला सूचना देत आहे.

प्रा. सुधीर रसाळांचा हा निबंध दै. *मराठवाडा* (औरंगाबाद)च्या रविवार पुरवणींमध्ये प्रसिद्ध झाला आहे.

❖❖

# साहित्य मिथ्य माहित्य

## आशयलक्षी साहित्यचर्चा

**(मान्यवर साहित्यिक आणि समीक्षक प्रा. त्र्यं.वि. सरदेशमुख यांनी 'साहित्य मिथ्य माहित्य' ही लेखी संहिता बारकाईने वाचून चर्चेसाठी मांडलेले मुद्दे आणि त्यांची श्री. विश्वनाथ खैरे यांनी दिलेली उत्तरे हा लेखी संवाद येथे प्रकाशित करीत आहोत - संपादक)**

***सरदेशमुख** : आशयाच्या अंगाने साहित्याचे दर्शन तत्त्वसिद्धक होते. आशय वस्तुसापेक्ष असतो. तो 'काय' आणि कसा सांगितला हे महत्त्वाचे. 'कोणी' सांगितला हे तितके महत्त्वाचे नसते. साहित्य हे माहित्य असते, कधी ते मिथ्य असते. तिन्हीत 'अर्थान्तरा'स भरपूर वाव असतो. 'अर्थांतर' 'मेंदवी' असते. हा अपुर्ता गोषवारा समजूया.*

***खैरे*** : आशय वस्तुसापेक्ष असतो, हे खरे; पण तो केवळ वस्तुसापेक्ष नसतो. साहित्य हे भाषेच्या माध्यमातले विधान असते; जसे शिल्प हे दगडाच्या माध्यमातले एक विधान असते. शब्द, वाक्य या संकेतरूप पायऱ्यांनी साहित्याच्या विधानापर्यंत आपण पोचतो. शब्द, वाक्य, यांचेही आपापले आशय असतात. त्यांच्या आशयांची नुसती साधी बेरीज करून साहित्य-विधानाचा आशय प्राप्त होत नाही. गणितातल्या संकेतांची अशी बेरीज होऊन एखाद्या प्रमेयाचा आशय बहुतांशी सिद्ध होतो, तसे साहित्यात होत नाही. कारण गणितातल्या चिन्हांचे अर्थ अथवा आशय सर्वांना सारखेच भावले पाहिजेत अशी काटेकोर आधारणी मुळापासून गृहीत धरलेली असते. शब्द या आधारभूत चिन्हांचे किंवा संकेताचे अर्थ किंवा आशय अगदी वस्तुवर्णनाचे असले तरी साहित्यकार ते वाकवीत असतो, वाक्यरचनेचे विविध प्रकार उपयोजून विधानांना काही प्रमाणात अनेकार्थी वनवतो आणि साहित्यकृतीच्या विधानाचा अर्थ किंवा आशय त्यामुळे बहुमित होतो. साहित्य-वाचक त्या विधानांचे आकलन आपल्या पद्धतीने आणि परीने करतो, त्यात तो जो आशय पाहतो तो साहित्यकाराला इष्ट असलेल्या आशयापेक्षा निराळा असू शकतो. साहित्यविधानातून (माझ्या-सारख्या) वाचकाला भावणारा आशय, (मला वाटणाऱ्या) साहित्यकारेष्ट आणि वाचकार्जित आशयाशी जुळतो का, जुळत असला तर मानवी बुद्धीच्या (मेंदूच्या) क्रियाकलापांशी त्यांचा संबंध काय असावा याचा शोध घेण्याचा या तीन व्याख्यानांत प्रयत्न केला.

आशयाच्या वस्तुसापेक्षतेचा विचार साहित्य व शिल्प यांच्या तुलनेने करता येईल. शिल्प हे ठोस वस्तुरूपाने आपल्या-समोर अवकाशाच्या तिन्ही मिती घेऊन उभे असते. डोळ्यांनी पाहून, पाहण्यातून ज्ञान मिळवणाऱ्या मेंदूच्या टवक्याद्वारे त्याचा आशय आकळून त्याची समीक्षा वगैरे आपण करू शकतो. त्या अर्थाने साहित्याला वस्तुरूप नसल्यामुळे त्याचा आशय तसा वस्तुसापेक्ष नाही. आणखी एक महत्त्वाचा फरक आहे. माणसाने घडवलेल्या शिल्पासारखीच वस्तुरूपे नदीच्या गोट्यांमध्ये किंवा डोंगराच्या कड्यावर आढळू शकतात. त्यांना प्राकृतिक शिल्पकृती म्हणता येईल. प्राकृतिक शिल्पकृतीचे आकलन कल्पनेनेच होते. साहित्य ही पूर्णतया आणि केवळ मानवी कृती आहे, मात्र ती मानवाच्या हातांनी वस्तुरूप पावत नाही, मेंदूतल्या विचारशक्तीने कल्पिलेल्या अशरीर रूपात असते.

प्राकृतिक शिल्पाचा आशय 'काय' याचाच विचार आपण मुख्यतः करू शकतो. तो 'कसा' व्यक्त झाला याचा विचार दुय्यम असतो. तो 'कोणी' त्यात भरला याचा विचार तर गैरलागूच ठरतो. साहित्याच्या आशयाचा विचार प्राकृतिक शिल्पाच्या आशयाच्या विचाराला समांतर मानता येईल. त्याच्या न्यायाने, साहित्याचा आशय 'काय' आहे हा सर्वांत महत्त्वाचा, तो 'कसा' व्यक्त झाला हा दुय्यम आणि 'कोणी' व्यक्त केला हा सर्वांत कमी महत्त्वाचा विचार ठरतो.

***सरदेशमुख** : बहिणाबाईंची कविता, एक वेदसूक्त, बालकवींचा 'औदुंबर' ही उदाहरणांसाठी घेतलीत. त्याआधी जिब्रान-काणेकरांचा किस्सा येतो. त्याच्या आधाराने आशयाच्या अस्सलपणाविषयी शंका यावी अशी स्थिती होते. बहिणाबाई, बालकवी यांच्यासारखा आशयानुगामी अर्थप्रत्यय न घेताही काल्पनिक रचना करता येतील त्या अनुकरणशक्तीने. विशिष्ट रचनारीत व शब्दवेचणी यांच्या साह्याने अनुकरण सुलभ होते व अर्थाचा आभास होऊ लागतो. मूळ कवींनाही तसा आभासप्रत्यय वस्तुसंदर्भाने आलेला असण्याची शक्यता. पण*

अनुक्रमणिका

*तो सत्याभास आहे असे आपण मानतो. कारण आपल्या माहितीप्रमाणे त्यांचे एक व्यक्तिमत्त्व (पर्सनॅलिटी) आपण कल्पिलेले असते. त्याच्याशी जोडून तो सत्याभास आपल्याला अर्थवान वाटतो.*

***खेरे*** : रूढ परिभाषेत सांगायचे तर साहित्यिक, वाचक किंवा रसिक, आणि समीक्षक या तिघांच्या आशयसंबंधित मेंदवी क्रियांचा हा विचार किंवा शोध आहे. साहित्य वाङ्मयरूपात केवळ हवेत असते, लिखित (कागद, दगड, फीत या कशाच्याही पाठीवरील) रूपात त्याला वस्तुरूप लाभते. तरी आशय मात्र पूर्णतया मेंदवी स्वरूपातच 'अस्तित्वात' असतो. तो जोवर मुखी किंवा लेखी रूपात जगासमोर येत नाही तोवरच साहित्यिकाच्या व्यक्तिमत्त्वाचा अविभाज्य भाग असतो. मूल जसे आईच्या कुशीतून बाहेर आले की, तिच्या व्यक्तिमत्त्वाचा भाग राहत नाही, तसेच साहित्य व्यक्तरूपात बाहेर आले की, साहित्यिकाच्या व्यक्तिमत्त्वाचा भाग राहत नाही.

आशयाची बांधणी ही फक्त माणसाच्या मेंदूला लाभलेली क्षमता आहे. पण हिच्याबरोबर इतरही कित्येक क्षमता त्या मेंदूला लाभलेल्या आहेत. त्या सर्व क्षमतांचे मिळून माणसाचे व्यक्तिमत्त्व बनलेले असते. त्यामुळे साहित्याचा आशय हा साहित्यिकाच्या व्यक्तिमत्त्वाचा एक अंश मात्र असतो. साहित्याच्या आशयात किंवा शरीरात व्यक्तिमत्त्व संपूर्णपणे येऊच शकत नाही; आणि आशयाच्या बांधणीसाठी स्वतःशिवायच्या विश्वाचाही परिणाम, विचार वगैरे आवश्यक असल्यामुळे आशय हे केवळ व्यक्तिमत्त्वाचे फळ मानता येत नाही. म्हणजे, दोन्हींकडून आशय-व्यक्तिमत्त्व या संहती केवल-निबद्ध नाहीत.

बहिणाबाईंची कविता आचार्य अत्रे यांनी पहिल्यांदा ऐकली तेव्हा, किंवा बालकवींनी साहित्यसंमेलनात आपली कविता पहिल्यांदा वाचली तेव्हा, त्यांचा परिचय कोणालाही नव्हता. त्यांच्या कवितांना दाद मिळाली ती कवितांमुळे, कवींमुळे नव्हे. जिब्रानचे नावसुद्धा मराठी वाचकांना माहीत झाले ते खांडेकरांच्या अनुवादांमुळे. बहिणाबाई, बालकवी आणि जिब्रान या तिघांचेही व्यक्तिमत्त्व वाचकांना त्यांच्या साहित्यावरून जे काय माहीत झाले असेल तेच. अर्थातच त्यांचे साहित्य वाचकांना भावले, त्यांची व्यक्तिमत्त्वे नव्हेत. पुन्हा, साहित्य भावले म्हणजे त्याचा आशय भावला, 'काय' तो भावला, 'कसा' सांगितला याचाही त्या भावण्यात फारसा वाटा नव्हता. बालकवींची 'औदुंबर' कविता तर त्यांच्या इतर कवितांहूनही अगदी वेगळ्या प्रकारची आहे असा सर्वांचा अभिप्राय आहे. म्हणजे, बालकवींच्या व्यक्तिमत्त्वातला रचनाकारपणा जो सरासरीने दिसतो त्याच्याशी या कवितेने फारकत घेतलेली आहे. जिब्रानची नक्कल म्हणून काणेकरांनी ज्या रूपककथा लिहिल्या त्यांतल्या काहींनाच समीक्षकांनी मोठेपणा बहाल केला. जोगांनी म्हटल्याप्रमाणे, बहुतेकांना त्याच कथा भावल्या होत्या आणि म्हणूनच 'कोणी' पेक्षा 'काय'ला महत्त्व आहे असे जोगांनी रास्तपणे सुचवले. काणेकरांच्या नकलकारीमुळे आशयाच्या अस्सलपणाविषयी शंका येण्यापेक्षा, त्याची कदर करण्याची शिकवण मिळते; खुद्द काणेकरांनीही आपल्या गौप्यस्फोटाच्या लेखात याच अंगाने कैफियत मांडली होती.

बालकवींची नक्कल मी स्वतःही सांगूनसवरून चार ओळींच्या रचनेत केलेली आहे. बालकवींची 'विशिष्ट रचनारीत व शब्दवेचणी यांच्या साह्याने अनुकरण सुलभ' झाले हे खरेच. त्या चार ओळींत अर्थाचा म्हणजे आशयाचा आभास झाला का, कितपत झाला हे श्रोत्यांनी व वाचकांनी ठरवायचे आहे. 'मूळ कवींना तसा आभासप्रत्यय (औदुंबराच्या) वस्तुसंदर्भाने आलेला असण्याची शक्यता' मात्र वाटते. कारण तो आशय, कुसुमाग्रजांनी सूचित केलेला, त्यांत गुंफला आहे; म्हणजे बालकवींसारख्याच भासप्रत्यय घेऊ शकणाऱ्या दुसऱ्या कवीच्या मेंदवी प्रत्ययक्षमतेतून तो आलेला आहे. यदाकदाचित बालकवींनी अशा चार ओळी लिहिल्याच असत्या तर त्या याच शब्दांत आल्या असत्या असे मात्र मी म्हणू शकणार नाही. शब्द, वाक्य, विधान इत्यादी आधीच्या विवेचनावरून हे स्पष्ट होईल. या संदर्भात पुन्हा शिल्प किंवा चित्र यांच्या नकलेचे उदाहरण घेता येईल. मोना लिसाच्या चित्राची किंवा बुद्धमूर्तीच्या शिल्पाची वस्तुरूप नक्कल कोणी हुबेहूब केली तर तिच्या दर्शनाने बघणाऱ्याला भावणारा आशय (सीमित अर्थाने त्या कलाकृतीतला आशय) मूळच्याहून उणा किंवा वेगळा असेलच का? बहुधा नसावा. नसल्यास त्याचे कारण या कृतींच्या वस्तुरूपत्वात असेल. साहित्याला त्या अर्थाने वस्तुरूप नसल्यामुळे शब्दरूपांनी पुढे मांडलेला आशय अस्सलात आणि नकलेत वेगळा भासण्याची शक्यता खूप जास्त आहे.

साहित्यरचनेतला आशय कवीच्या आपण (म्हणजे एकंदर वाचकांनी असे समजूया) कल्पिलेल्या व्यक्तिमत्त्वाशी जोडण्यात काहीसा गोलाकार विचार होतो. कवीच्या व्यक्तिमत्त्वाची कल्पना बांधण्यासाठी त्याचे सर्व नाही तरी पुष्कळ साहित्य वाचून






त्यातला आशय आकळून घ्यावा लागेल. त्यावरून मग त्यातल्याच एखाद्या कवितेच्या आशयाची कल्पना करायची. ती कल्पना एक प्रकारे पूर्वग्रहाने बाधित असू शकेल. कृतीपेक्षा व्यक्तीला मोठेपणा देण्याची समाजप्रवृत्ती असल्यामुळे ज्याचे नाव एकदा मोठे झाले त्याच्या सामान्य कृतीतही मोठा आशय पाहिला जातो.

***सरदेशमुख*** : *प्रश्न पडला की आशय व्यक्त करणाऱ्या शब्दांचे, वस्तुचिन्हांचे 'मेंदवी अर्थांतर' होते त्यामागची शक्ती कोणती? ती वस्तूत असते की चिन्हात? की वाचकात? चिन्हांचे अर्थांतर नेहमीच होते काय? सगळ्यांमध्ये सारखे तर होत नसेल... मग अर्थभेद होतो तो कशाने?... 'मेंदू' ही जीवाची समग्रता आहे काय? की मेंदूला प्रचोदन करणारी 'प्राणचेतना' ही समग्रता? चेतनेला अर्थ देणारी जाणीव येते कुठून? जाते कुठे?*

***खैरे*** : शब्दांचे अर्थांतर करणारी शक्ती ही अर्थात मेंदूची आहे. ती वस्तूत किंवा चिन्हात नाहीच. चिन्हाची आणि शब्दांची निर्मितीच मेंदूने केली असल्यामुळे, त्यांच्यात परस्पर-अर्थान्तरे घडवणे मेंदूला सहज शक्य आहे. वर म्हटल्याप्रमाणे, साहित्यात आशय पाहणारी शक्ती लेखक आणि वाचक (समीक्षक वाचकच असतो) या दोघांतही असते. साहित्यातला आशय अर्थान्तरांनी विशेष प्रमाणात साकळलेला असतो, हा एक पैलू या व्याख्यानात दाखवून दिला आहे. मेन्दवी क्रियाकलाप अत्यंत जटिल असल्यामुळे साहित्याची ही एकमेव उपपत्ती होऊ शकत नाही हेही त्यात सांगितले आहे. गणितात चिन्हांचे अर्थान्तर होत नाही, साहित्यात होते. सारखणाने, तुलनेने मेंदूला ज्ञानप्राप्ती सुलभ होते म्हणून सर्वसामान्य माणूसही चिन्हांच्या अर्थांतरांचा अवलंब करीत असतो. देशीपणाच्या निबंधात अगदी आदिमांनी शब्द प्रचारात आणताना अर्थांतरे कशी योजली आहेत हे दाखवून दिले आहे. सगळी माणसे सारखेच अर्थान्तर करीत नाहीतच. म्हणून तर अस्सलातली आणि नकलेतली शब्दयोजना सारखी राहू शकत नाही. लेखकाच्या एकाच साहित्यविधानाचे वेगवेगळे अर्थ याचमुळे विविध वाचकांच्या लेखी वेगळे होत असतात. कारण शब्द या चिन्हाचे वाच्य वस्तुरूप कल्पिण्यात फरक पडू शकतो किंवा अर्थांतरासाठी कोणता पैलू लक्षात घ्यायचा यातही फरक पडू शकतो. आंबा या फळाला नाव देताना नामरूपरसांचा आधार उपयोगी पडला, तर कालिदासाला त्याच फळाच्या रंगरूपामुळे अमरमिथुनांची आठवण झाली.

मेंदू ही जीवाची समग्रता अर्थातच नाही. पण जीवाचे सर्व क्रियाकलाप मेंदू नियंत्रित करतो तसेच सगळी विचारशक्ती मेंदूतच अधिष्ठित आहे. प्राणचेतना ही समग्रता आहे असे एका अर्थी म्हणता येईल, पण जगणे या जाणवणाऱ्या आविष्काराशिवाय प्राणचेतना जाणवत नाही. चेतनेला अर्थ देणारी जाणीव येते कुठून आणि जाते कुठे हे प्रश्न, या व्याख्यानांच्या विषयाच्या फारच वरचे आहेत आणि त्यांची उत्तरे माझ्याकडे तर नाहीतच.

***सरदेशमुख*** : साहित्यातील अर्थान्तर-प्राप्तीचे काही नियम-संकेत तर कालौघात आपण बांधीत आलो नसू?

***खैरे*** : या प्रश्नाचे उत्तर 'होय' असेच द्यावे लागेल. भारतीय साहित्यशास्त्रात रामायण-महाभारत या महाकाव्यांना महात्मता देऊन काही नेमनियम सांगितले. अरिस्टॉटलच्या काव्यशास्त्राचा दरारा साहित्यविचारात अजूनही आहे. मेंदू ऐवजी मन, भावना, बुद्धी इत्यादी संहतींची मूलाधारी कल्पना करून साहित्यविषयक विवेचन होत आले आहे. हृदय आणि बुद्धी यांचे दुइत मानून साहित्य हे मुख्यतः हृदयाशी निगडित मानले गेले. ज्ञान किंवा आशय यांच्या प्राप्तीपेक्षा आनंद किंवा सौंदर्य यांच्यासाठी साहित्याचा अवतार आहे असे मानले गेले. या सर्वांचे शरीरातले कार्यस्थळ मेंदू हे एकमेव आहे हे ध्यानात घेतले तर दुइताने उभे केलेले वरेच नियम-संकेत मागे पडतील. उदाहरणार्थ, ज्ञानेश्वरीतील (उपमा-रूपक-दृष्टान्तादी) अर्थान्तरे संबंधित विषयाच्या विविध पैलूंचे ज्ञान करून देण्यासाठी योजलेली आहेत; त्यांतच आपण आनंद-सौंदर्यांचा अनुभव घेत असतो, याचे भान ठेवले तर ज्ञानेश्वरीत काव्य आहे का अध्यात्म यासारखे वाद बाद होतील.

***सरदेशमुख*** : *वस्तुसापेक्ष अर्थान्तर आणि व्यक्तिसापेक्ष जाणीव यांचा अंतःसंबंध, यांचा संघर्ष टाळता येणे शक्य आहे काय? दोहोंचे समान्तरपण आणि संमीलन यांच्याही कितीएक छटा संभवतात. विज्ञानात अनभिज्ञ म्हणून हे प्रश्न पडत असतील.*

***खैरे*** : अर्थान्तराकरता एका वस्तूचे शब्दचिन्ह वापरून दुसऱ्या वस्तूच्या शब्दचिन्हाने निर्दिष्ट वस्तूशी तिचे सारखण केलेले असते इतकीच वस्तुसापेक्षता अर्थान्तरात असते. सारख्या गुणांची जाणीव ही पूर्णतया व्यक्तिसापेक्ष असते. त्यांच्यात विरोध असण्याचे काही कारण दिसत नाही. व्याख्यानात सांगितल्याप्रमाणे, अर्थांतरांत उल्लेखिलेल्या वस्तूंच्या भौतिक क्रिया किंवा संबंध यांच्याविषयी अर्थांतराने किंवा अन्य मेंदवी

क्रियेने (विश्लेषण वगैरे) चुकीचे आडाखे बांधले तर, वस्तुसापेक्ष वस्तुस्थिती (उदा. विज्ञान) आणि व्यक्तिसापेक्ष जाणीव यांच्यात विरोध संभवतो. साहित्य जे अर्थान्तरबहुल असते ते मानवी मनाच्या भावनात्मकादी एकाच अंगाचा आविष्कार असे मानले नाही तर हा तिढा सुटेल.

***सरदेशमुख*** : *तुकाराम, नामदेव, ज्ञानदेव यांची स्वाक्षरी घालून अनेक जुन्या कवींनी अभंगरचना केली आहे. 'कसे' आणि 'काय' सांगितले इतक्यापुरती, आशयाचा आभास निर्माण करण्यापुरती, ती रचना कामास आली असेल. पण त्या शब्दांमागील व्यक्तिमत्त्वाची अर्थवत्ता तिच्यात असेल का? म्हणून वाटते की, वस्तुसापेक्षता पुरी पडत नसावी. 'शब्द' तर प्राणाशी जोडलेला आहे. प्राण जाणिवेशी, जाणीव व्यक्तिमत्त्वाशी.*

***खैरे*** : स्वाक्षरीच्या प्रकरणाचा दोन्ही बाजूंनी विचार केला पाहिजे. जुन्या काळातच कशाला, विसाव्या शतकातदेखील शांताराम आठवले यांनी 'आधी बीज एकले' अभंग रचला आणि पांगारकर तो गाथ्याच्या प्रतींमध्ये शोधीत बसले. आठवल्यांनी तुकारामासारखे पाच हजार अभंग लिहिले नाहीत, तेवढे मोठे त्यांचे व्यक्तिमत्त्व नव्हते. पण त्या एका अभंगातला आशय तुकारामाच्या एका अभंगातल्याइतका होता की नाही? तुकारामाचा तरी प्रत्येक अभंग सारखाच आशयघन कुठे आहे? बहिणाबाईंची आणि अश्विनसूक्तातली अर्थांतरे एकाच परीची आहेत, तसेच बीज-रोपांचे अर्थांतर तुकोबांच्या तोलाचे पांगारकरांना वाटले, तर त्या अभंगाला आशयवत्तेचे श्रेय द्यायला पाहिजे. आठवल्यांना तुकाराम म्हणावे असे मुळीच नाही. दुसऱ्या बाजूला, 'काट्याच्या अणीवर' सारख्या करमणुकीच्या गीतावर ज्ञानदेवांची मुद्रा लागली की ना.ग. जोशींनी त्यातून अध्यात्मिक अर्थ काढून दाखवला. म्हणजे, 'व्यक्तिमत्त्वाची अर्थवत्ता' नुसत्या नामनिर्देशाला लाभली. हे फारच फसवणारे अर्थांतर झाले. संस्कृत साहित्यात गुणवत्तेचे निकष तयार झाले होते, तसाच व्यक्तिमत्त्व हा निकष झाला तर साहित्याच्या अर्थवत्तेला कमी महत्त्व येईल आणि स्वाक्षरीला जास्त. मग साहित्यसम्राट केळकरांच्या कादंबरीला नावाजले जाते आणि *एक झाड दोन पक्षी* मधली कृतक-त्रयस्थता आदर्श मानली जाते. माडगूळकर एका बाजूला 'कवी नव्हे, गीतकार' म्हणून हिणावणीचे तर दुसरीकडे 'महाराष्ट्र-वाल्मीकि' पदवीचे धनी होतात. त्यांच्या सिने-गीतांचा आशय निश्चितच गीतरामायणापेक्षा नवा तरी होता, याची दखल घेतली गेली नाही. अनेक अनामिक अडाण्यांनी एकेका चांगल्या म्हणीत आशयघन साहित्य भरून ठेवले आहे. त्यांनी कदाचित तेवढेच साहित्य निर्माण केले असेल आणि त्यांचे व्यक्तिमत्त्व नगण्य दर्जाचे असेल. तरीसुद्धा त्या म्हणींना साहित्य म्हणून गौरवावे लागेल.

साहित्यविधानाच्या आशयापेक्षा, साहित्यिकाच्या व्यक्तिमत्त्वाला अधिक महत्त्व दिल्यामुळे समीक्षेचे दंडकसुद्धा बदलले आणि 'ज्ञानोपासनेला खंड' पडल्यासारखी परिस्थिती झाली. 'साहित्याची समीक्षा होण्यापेक्षा साहित्यिकांच्या लकवी-सवयींची' चर्चा होते; कारण सामान्यजनांना त्यातच व्यक्तिमत्त्व बसल्यासारखे वाटते. ('ठणठणपाळां'च्या खुसखुशीत वाटणाऱ्या साहित्यटिपणांनी सगळ्या मराठी समीक्षेलाच एक चुकीचे वळण दिले असे मला वाटत आले आहे.) वा.भ. बोरकरांनी श्री. पु. भागवतांना कवीच्या नावाशिवाय कविता धापायची सूचना केली होती. ती अमलात आली असती तर कवींच्या नामावळीऐवजी चांगल्या कवितांच्या ओळी लोकांच्या तोंडी खेळल्या असत्या.

शब्द हा मुखातून बाहेर येणाऱ्या वायूने (प्राणाने) निर्माण होतो म्हणून तो जुन्या साहित्यात प्राणाशी जोडला गेला. पण विविध शब्द निर्माण होण्यासाठी वायूवर नियंत्रण ठेवतो, चिन्ह म्हणून शब्दाच्या ध्वनीमध्ये अर्थ भरतो, तो मेंदू. मेंदू, प्राण आणि जाणीव यांचा संबंध आहेच; तो साहित्याविषयीच्या विचाराच्या पलीकडचा आहे. साहित्य हाही ज्ञानयत्नच असतो हे मान्य केले तरी साहित्याने अंतिम ज्ञानापर्यंत पोचता येणार नाही. त्या चरम सीमेवर शब्द (आणि म्हणून साहित्य) संपायचा असतो. शब्दचिन्हांची अर्थांतरे न होणे ही शब्द संपण्याची बरीच आधीची पायरी असली पाहिजे. गणितात ती काही प्रमाणात ओलांडली जाते. प्राण जाणीव इत्यादींच्या सत्यज्ञाना-साठी चेतनाशक्तीबरोबर विज्ञानही जरूर असावे. ते काही असले तरी, साहित्याला प्राणशक्ती चेतनाशक्तीचा थेट आविष्कार मानण्याचे कारण नाही.

***सरदेशमुख*** : *शब्दामधली प्राणवान अर्थवत्ता (प्रांजळ, प्राणाणिक, एकाग्र) कशी शोधायची हा प्रश्न कळीचा वाटतो.*

***खैरे*** : एकेका शब्दात चिन्हाची संकेतजन्य अर्थवत्ता असते, भारतीय साहित्यशास्त्रात तो संकेत ईश्वरेच्छेशी किंवा नंतर इच्छामात्राशी (म्हणजे सामाजिक इच्छेशी) जोडला गेला आहे. शब्दांमधली प्राणवान अर्थवत्ता ही खरोखर वाक्याची किंवा त्याहीपेक्षा साहित्यविधानाची म्हटली पाहिजे. 'प्राणवान अर्थवत्ता' या प्रयोगामागे परंपरागत भारतीयाची 'वाचमर्थोऽ-नुधावति' ही धारणा प्रकट होते. वास्तविक समोर असलेल्या साहित्यविधानाचा अर्थ किंवा आशय समाजाने शब्दांना दिलेल्या


अनुक्रमणिका

अर्थांवरून, भाषेच्या मान्य व्याकरणाच्या मदतीने, अर्थांतरे वगैरे लक्षात घेऊन, आकळता आला पाहिजे. तो जितपत किंवा जो आकळेल त्याच्यापलीकडे त्यात आणखी काही अर्थ पाहणे, साहित्यवस्तूत दैवी किंवा अतिमानवी तत्त्व गृहीत धरूनच शक्य होईल. तसा विचार व्याख्यानांच्या कक्षेबाहेरचा आणि माझ्या क्षमतेच्याही बाहेरचा होईल. (मला तो जरूर वाटत नाही हेही नमूद करतो.) साहित्यविधानाचा व्यक्तिमत्त्वाशी संबंध जोडण्याचा ऊहापोह वर झाला आहे.

***सरदेशमुख*** : *'अर्थान्तरा'त 'अर्थ' महत्त्वाचा न राहता, 'दुसरा अर्थ' बळावतो, ते तसेच होण्याच्या अपेक्षेने असावे. जिब्रानचे थट्टेवजा केलेले अनुकरण, असंशय वाचकाला मायारूपाने चकवीलही, पण अनुकरण करणाऱ्याला सतत डिवचत राहील.*

***खैरे*** : पहिल्या वाक्यातले विधान भारतीय पुराणकथांना पूर्णपणे लागू पडते. धुमकेतूला अर्थांतराने वानर म्हटले आणि ते अर्थांतरच बळावून बसले. इतके की, रामायण या साहित्याच्या मानदंडाचा तीन सप्तमांश भाग वानरांच्या कर्तुकीने व्यापला. हे सहेतुक घडले. आणि ते गंभीरपणे घडवले गेले. वाचकांच्या शेकडो पिढ्यांना त्या अर्थांतराने मायावीपणे चकवले. अर्थांतर करणाऱ्यांना ते डिवचण्याचा प्रश्नच नव्हता; ते साहित्यविधान करून आपण स्वतःसाठी आणि वाचकांसाठीही पुण्यसंचय केला अशी त्यांची (प्रामाणिक?) भावना होती. प्रांजळ विचार करणाऱ्या आधुनिक वाचकाला हे अर्थांतर डिवचत राहिले. **संमत** लेखनात यातल्या 'बळावलेल्या दुसऱ्या अर्था'मागचा 'अर्थ' उघड करून दाखवला आहे. विश्वातल्या गोचर तथ्यांची अर्थांतरे करायची, त्यांच्या शब्दचिन्हांनी संकेतित वस्तूंना सजीव पात्रांचे रूप द्यायचे आणि कथेचे साहित्यविधान करायचे असे पुराणकथांच्या निर्मितीचे स्वरूप आहे. आधुनिक भारतीय साहित्यसुद्धा मोठ्या प्रमाणात या पुराणकथांवर आधारले असल्यामुळे दुसऱ्या अर्थाचा तिसरा चौथा अर्थही बळावून बसला आहे. मूळ अर्थ याला तथ्य म्हटले. पुराणकथांच्या मुळाशी अधिक पुराणे मिथ्य असते ते तथ्याच्या अर्थांतराने सिद्ध झालेले असते. धुमकेतू हे गोचर तथ्य, वानर हे मिथ्य. धूमकेतू या तथ्यामागचे सत्य शोधण्यासाठी विज्ञानपद्धतीची गरज आहे. तथ्याचे अर्थांतर करून धूमकेतूच्या दृश्य (तो इतक्या दूर असतो की, त्याचे फक्त दर्शनच माणसाला होऊ शकते.) गुणधर्मांचे विधान केल्याचे समाधान कदाचित प्रामाणिक पुराणकथाकाराला मिळाले असेल. पण त्यातून धूमकेतूचे सत्य कळून यायला काही मदत झाली नाही; किंबहुना हे फारच दुरावले. साहित्यातून 'जाणिवेची कळा' वाढावी ही अपेक्षा पुराणकथांनी पुरी केली नाही.

विज्ञानाच्या मदतीने आपण ही स्थिती सुधारू शकू. त्यासाठी साहित्याची रचना मिथ्यांपेक्षा तथ्यांवर आधारून केली पाहिजे. साहित्य सिद्ध करण्यासाठी करावी लागणारी अर्थांतरे तथ्यवाचक शब्दचिन्हांवरून करावी लागतील. या प्रकारचे साहित्य हे माहित्य असेल. ही तथ्ये भौतिक विश्वासंबंधीचीच असण्याचे कारण नाही. मानवसमाजाविषयीची सुद्धा असतील. अशा प्रकारची साहित्यरचना आधी झालीच आहे. नव्या माहितीयुगात तिला आणखी बहर यावा. माहित्याचा पाठपुरावा करण्यात साहित्याला जखडबंद करण्याचा सुतराम उद्देश नाही. उलट, आत्मविष्कार, मानवी मनाच्या कल्लोळांचे चित्रण यांसारख्या मर्यादांच्या कुंपणाबाहेर साहित्याला मोकाट वावरायला मिळावे ही आकांक्षा आहे.

***सरदेशमुख*** : *व्यक्तिमत्त्व, चेतनार्थ (spiritual consciousness), जाणिवेच्या विकसनातून येणारी व्यंजना ही तथ्यातून येतात त्याहून वेगळ्या अभिप्रायाने मिथ्यांच्या आश्रयाने उद्भवतात असे दिसते. त्यामुळे केवळ तथ्यातून साहित्याला अर्थवत्तेची उभारी आणि एकूण मनोहारित्व येते असे नसावे. माहित्य एकेक वेगळ्या चारित्र्याच्या जाणिवेतून प्रकटते तसेच आस्वादले जाते तेव्हा ते साहित्य होत असावे, याविषयी तुम्ही बहुतांश सहमत नाहीत हे मला माहीत आहे.*

***खैरे*** : उदाहरणार्थ, डोंगर एक गोचर, एक वस्तू आहे. मानवी व्यक्ती डोंगर पाहते तेव्हा 'डोंगर आहे' हे व्यक्तीच्या मेंदूचे कळित होते. मेंदूच्या आठवकोशात डोंगर हे एक तथ्य होते. आठवातल्या शब्दचिन्हांच्या आधारे व्यक्ती 'डोंगर' असे बोलते किंवा लिहिते ते एक विधान असते. पुढेमागे काही संदर्भ नसताना 'डोंगर' हे केवळ तथ्य असते, साहित्य नसते. 'उघडाबोडका डोंगर' म्हणण्यात मानवाशी सारखण, म्हणजेच काही अर्थांतर निहित आहे. हे विधान साहित्याचा भाग होऊ शकेल. 'डोंगर पहारेकरी आहे' हेही साहित्याचे विधान होऊ शकेल. पण त्यातच मिथ्याचेही बीज आहे. मिथ्य साहित्यरूप असते ते या अर्थाने.

व्यक्तिमत्त्व, चेतनार्थ यांच्या जागी मेंदूची योजना केली तर साहित्य या मेंदूनिर्मित वस्तूचे विवेचन वस्तुस्थितीला अधिक जवळचे होते. ज्ञानेश्वरी हे साहित्य, spiritually conscious ज्ञानेश्वरांच्या जाणिवेच्या विकसनातून प्रकटले असले तरी त्याचे प्रकट रूप मराठी शब्दचिन्हांचे आहे आणि मराठी जाणणारा मेंदू त्याचे आकलन करून घेत असतो.










म्हणून ज्ञानेश्वरी-साहित्याचा आशय, त्याच्या मराठी शब्द-विधानांतून लाभेल तितकाच असेल. त्या शब्दविधानांमध्ये कवित्व, रसिकत्व आणि परतत्त्वही सामान्य मराठी वाचकालाही जाणवावे इतके भरले असल्यामुळे ते श्रेष्ठ साहित्य होते. ज्ञानेश्वरांना प्रेरणा देणारी चेतनाशक्ती कोणतीही असो, व्यक्त ज्ञानेश्वरी त्यांच्या आठवकोशातल्या मराठी शब्दचिन्हांनी घडलेली आहे, म्हणून मेंदवी निर्मितीच आहे. आपण साहित्याचा विचार करीत असताना चेतनाशक्तीपर्यंत जावे लागत नाही ते एवढ्याच अर्थाने.

केवळ तथ्यांनी साहित्य घडतच नसल्यामुळे तेवढ्याने अर्थवत्तेची उभारी किंवा मनोहारित्व येणे शक्यच नाही. मिथ्यांच्याऐवजी तथ्यांच्या कळिताचे होते ते साहित्य म्हणजे माहित्य. सर्वच मानवी संस्कृतींमध्ये मिथ्ये आणि मिथ्यकथा यांनी पहिले साहित्य अस्तित्वात आणल्याचे दिसून येते. मिथ्यांमध्ये तथ्यांचे अर्थांतर असतेच. प्लेटोच्या संवादांत Theatetus sits हे विधान सत्य. तर Theatetus flies हे विधान असत्य म्हटले आहे. आपल्या परंपरेत Hanuman flies हे सत्य मानले गेले आहे. म्हणजे माणसाच्या वावतीतले असत्य विधान मिथ्याच्या वावतीत (श्रद्धेने) सत्य मानले जाते. मिथ्याच्या साहित्याचे हे लक्षणही म्हणता येईल. 'पिसाटापरी केस पिंजारुनी हा धूमकेतू' हे विधान धूमकेतू या तथ्याचा निर्देश करीत असल्यामुळे माहित्य म्हणता येईल. पहिल्या तीन शब्दांतल्या अनेक अर्थांतरांनी आणलेला साहित्यपणा त्यात आहेच. या अर्थाने माहित्य आणि साहित्य यांच्यात अनुवंध आहे. धूमकेतूचे कोरडे शास्त्रीय वर्णन द्यायचे असले तरी त्याच्या मागील भागाला 'शेपूट' हे प्राणिसंबंधित अर्थांतर वापरतात. सजीवाच्या शेपटाशी त्याचे साम्य अवकाशातल्या विस्ताराच्या वावतीतले आहे इतकाच त्याचा आशय असतो. केवळ तथ्याच्या या विधानाला आपण साहित्य म्हणत नाही.

व्यक्तिमत्त्व किंवा चेतनार्थ यांना साहित्यविचारात आणताना आपण नकळत कमीअधिक गुणवत्तेचा विचार करीत असतो. जीवाच्या घटनेत अब्जावधी घटकांचा यदृच्छया समाहार होत असल्यामुळे, कोणतेच दोन जीव तंतोतंत सारखे नसतात. त्यामुळे दोन मानवी मेंदूंची निर्मिती आशयातही वेगळीच असणार. त्या वेगळेपणाचे मापनही मेंदूच करीत असतो. आशयाच्या आकलनाने लाभणारा आनंद, होणारे आकलन, मिळणारे क़ळित, घेतला जाणारा आस्वाद यांची व्यवस्था मेंदूच करीत असतो. मिथ्यसाहित्याचा आशय भौतिक जीवनात येणाऱ्या अनुभवांपेक्षा विलक्षण वेगळा असल्यामुळे मानवी मेंदूच्या पलीकडचा काही कारक त्या साहित्याच्या निर्मितीत लागला असावा असे धरून चेतनाशक्ती या कारक-मानीवाची योजना झाली. त्या मानीवाचा शोध मानव घेतच राहील. त्या शोधाचे साहित्य अधिक प्रमाणात माहित्य असेल.



---

## लेखक परिचय


❖ **सुधीर रसाळ** : मराठीचे निवृत्त प्राध्यापक, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद; नामवंत समीक्षक; *कविता आणि प्रतिमा* या ग्रंथाचे कर्ते. **पत्ता** : १००, श्रेयनगर, नवा उस्मानपुरा, औरंगाबाद.

❖ **त्र्यं.वि. सरदेखमुख** : ज्येष्ठ समीक्षक व ख्यातनाम कादंबरीकार, *शारदीय चंद्रकळा* (समीक्षा), *बखर एका राजाची, डांगोरा* व *उच्छाद* ही कादंबरी-त्रयी विशेष गाजलेली.

❖ **विश्वास नाईकनवरे** : टाटा इकॉनॉमिक कन्सल्टन्सी सर्व्हिस मधील निवृत्त संशोधक; मानवेंद्रनाथ रॉय यांचे निष्ठावंत अनुयायी व त्यांच्या 'रॅडिकल ह्युमनिस्ट' चळवळीतील खंदे कार्यकर्ते-प्रचारक. **पत्ता** : सकाळनगर, वाणेर रस्ता, औंध, पुणे ४११ ००७.

❖ **विश्वनाथ खैरे** : केंद्रीय सार्वजनिक बांधकाम खात्यातून अभियंते म्हणून निवृत्त; संस्कृत, मराठी, तमिळ या भाषांच्या आंतरसंबंधाचा विशेष अभ्यास. प्राचीन मिथ्यकथा, महाकाव्ये-पुराणे, प्राचीन भारतीय संस्कृती व परंपरा या विषयांमध्ये वैशिष्ट्यपूर्ण मौलिक लेखन; *एकलव्य, युरेका, वंशाचा व्यास* (नाटके), *भारतीय मिथ्यांचा मागोवा, ज्ञानेश्वरांचे चमत्कार* इत्यादी ग्रंथांचे कर्ते. **पत्ता** : ३७४, सिंध सोसायटी, पुणे ४११ ००७.

❖ **अ.र. कुलकर्णी** : सेवानिवृत्त सहसंपादक, मराठी विश्वकोश, वाई. **पत्ता** : 'ऋतुराणी', सिटी सर्व्हे, नं. २४१० क, मिशन हॉस्पिटलमागे, डाक बंगला रोड, वाई - जि. सातारा ४१२ ८०३.


अनुक्रमणिका








# शैलसूत्र

## मे.पुं. रेगे



---

**नमो तस्स भगवतो अरहतो सम्मासम्बुद्धस्य**

१. असे मी ऐकले आहे. एके वेळी भगवंत अङ्‌गुत्तरापामध्ये मोठ्या भिक्षुसंघासोबत, बाराशेपन्नास भिक्षूंबरोबर (पायांनी) फिरत असताना ते अङ्‌गुत्तरापाच्या आपण ह्या बाजारपेठेच्या गावी आले. केणिय ह्या जटाधारी तापसाने ऐकले की, शाक्यकुलात जन्मलेला आणि प्रव्रज्या घेतलेला श्रमण गौतम अङ्‌गुत्तरापामध्ये, मोठ्या भिक्षुसंघाबरोबर, बाराशेपन्नास भिक्षूंना सोबत घेऊन (पायांनी) फिरत असताना, आपण येथे येऊन पोचला आहे. ह्या पूज्य गौतमाची अशी शुभ कीर्ती पसरली आहे की, "हा भगवान् अर्हत् आहे, त्याला सम्यक् संबोधी (ज्ञान) प्राप्त झाली आहे, हा विद्याविनयसंपन्न आहे, सुगत (योग्य मार्गाने जाणारा) आहे, ह्याला विश्वाचे ज्ञान प्राप्त झाले आहे, हा अनुत्तर (सर्वश्रेष्ठ) आहे, माणसांना काबूत ठेवून त्यांना योग्य मार्गाने नेणारा सारथी आहे, देवमनुष्यांचा गुरू आहे, भगवान् बुद्ध आहे. स्वतः श्रेष्ठ ज्ञान प्राप्त करून घेऊन तो ते सत्य जगाला – देव, मार (दुरात्मे) आणि ब्रह्मा यांच्यासहित जगाला – श्रमणब्राह्मणांना, देवमनुष्यांना सांगत आहे. तो धम्माचा – जो धम्म प्रारंभी कल्याणप्रद आहे, मध्ये कल्याणप्रद आहे आणि शेवटी कल्याणप्रद आहे अशा धम्माचा – उपदेश करतो; परिपूर्ण, परिशुद्ध अशा ब्रह्मचर्याचे (निर्वाण प्राप्त करून देणाऱ्या जीवनमार्गाचे), त्याचा आशय आणि लक्षणे स्पष्ट करून, तो विवरण करतो. अशा अर्हतांचे दर्शन होणे शुभ असते."

मग तो जटाधारी केणिय भगवंतांकडे गेला. तेथे गेल्यावर त्याने भगवंतांना त्यांचे कुशल विचारले. त्यांच्याशी सौहार्दाने आणि आनंदाने संभाषण केल्यावर तो आदराने एका बाजूला बसला. एका बाजूला बसलेल्या त्या जटाधारी केणियाला धम्माविषयी उपदेश करून भगवंतांनी आनंदित, उत्तेजित, प्रेरित आणि उल्हसित केले. मग भगवंतांच्या धम्माविषयीच्या प्रवचनाने आनंदित, उत्तेजित, प्रेरित आणि उल्हसित झालेल्या त्या जटाधारी केणियाने भगवंतांना म्हटले, "उद्या सकाळी भगवंतांनी भिक्षुसंघासोबत माझ्याकडे भोजनासाठी येण्यास संमती द्यावी." हे घडल्यानंतर भगवंत त्या जटाधारी केणियाला म्हणाले, "हे केणिया, हा भिक्षुसंघ मोठा आहे. बाराशेपन्नास भिक्षू आहेत आणि तुम्ही ब्राह्मणांवर प्रसन्न आहात." आणि तो जटाधारी केणिया दुसऱ्यांदा भगवंतांना म्हणाला, "पूज्य गौतमा, भिक्षुसंघ मोठा आहे, बाराशेपन्नास भिक्षू आहेत आणि

मी ब्राह्मणांवर प्रसन्न आहे (तथापि) उद्या सकाळी भगवंतांनी भिक्षुसंघासोबत माझ्याकडे भोजनाला येण्यासाठी संमती द्यावी." आणि भगवंत जटाधारी केणियाला दुसऱ्यांदा म्हणाले, "हे केणिया, हा भिक्षुसंघ मोठा आहे, वाराशेपन्नास भिक्षू आहेत आणि तुम्ही ब्राह्मणांवर प्रसन्न आहात." आणि जटाधारी केणिया तिसऱ्यांदा भगवंतांना असे म्हणाला, "पूज्य गौतमा, भिक्षुसंघ मोठा आहे, वाराशेपन्नास भिक्षू आहेत आणि मी ब्राह्मणांवर प्रसन्न आहे, (तथापि) उद्या सकाळी भगवंतांनी भिक्षुसंघासोबत माझ्याकडे भोजनासाठी येण्यास संमती द्यावी."

भगवंतांनी स्तब्ध राहून संमती दर्शविली. मग त्या जटाधारी केणियाने भगवंतांनी संमती दिली आहे हे जाणले. तो आपल्या आसनावरून उठला, आपल्या आश्रमापाशी गेला आणि आश्रमापाशी गेल्यावर आपल्या मित्रांना आणि बांधवांना म्हणाला, 'प्रिय मित्रांनो आणि बांधवांनो, माझे म्हणणे आपण ऐकावे. मी श्रमण गौतमाला आणि (त्याच्या) भिक्षुसंघाला उद्या सकाळी भोजनासाठी आमंत्रित केले आहे. तेव्हा आपण आवश्यक ती सर्व कामे करावी." "जसे आपण म्हणता" असे म्हणून जटाधारी केणियाच्या मित्रांनी आणि बांधवांनी त्याच्या विनंतीला मान्यता दिली आणि काहीजण (विस्तवासाठी) खड्डे खणू लागले, काहीजण लाकडे फोडू लागले, काहीजण भांडी घासू लागले, काहीजण भांड्यांतून पाणी भरू लागले, काहीजण आसने मांडू लागले. आणि जटाधारी केणियाने स्वतः मंडप घालण्याची व्यवस्था केली.

२. त्यावेळी शैल हा ब्राह्मण आपण येथे राहात होता. तो तिन्ही वेदांत पारंगत होता, वेदातील शब्दांचे अर्थ, आणि (यागादी) विधी करण्याचे नियम यांत प्रवीण होता, शब्दांचे शुद्ध उच्चार आणि त्यांची व्युत्पत्ती हे शास्त्र त्याला अवगत होते, इतिहास हे पाचवे शास्त्र तसेच पदपाठ, व्याकरण, लोकायत' आणि महापुरुषाच्या लक्षणांविषयीचे शास्त्र ह्यांचा तो पंडित होता. तीनशे तरुणांना तो मन्त्रविद्या शिकवीत होता. त्यावेळी तो जटाधारी केणिया शैल ब्राह्मणावर प्रसन्न होता. मग तो शैल ब्राह्मण तीनशे ब्राह्मण तरुणांच्या समुदायासोबत येरझाऱ्या घालीत असताना आणि इतस्ततः हिंडत असताना जटाधारी केणियाच्या आश्रमापाशी आला. आणि शैल ब्राह्मणाने जटाधारी केणियाच्या आश्रमात काहीजण खड्डे खणीत आहेत..... (वरीलप्रमाणे) आणि जटाधारी केणिया स्वतः मंडपाची व्यवस्था करीत आहे हे पाहिले. तेव्हा तो जटाधारी केणियाला म्हणाला :

"काहो, श्रीमान केणियांच्या आश्रमातील वराशी (वाहेरून आलेल्या) वधूचा विवाह होणार आहे का? किंवा कुणा कन्येचा (वाहेरच्या) वराशी विवाह होणार आहे का? किंवा महायज्ञाचे प्रयोजन आहे का? की मगधाचा राजा बिंबिसार ह्याला त्याच्या सैन्यासह उद्या आमंत्रित करण्यात आले आहे?"

"नाही, शैला. आश्रमातील वराचा कुणा कन्येशी विवाह नाही किंवा कुणा कन्येचा वाहेरच्या वराशी विवाह नाही किंवा मगधाचा राजा सेनिय बिंबिसार ह्याला सैन्यासह उद्या आमंत्रित केलेले नाही. पण मी महायज्ञाचे प्रयोजन ठेवले आहे. शाक्यपुत्र श्रमण गौतम, ज्याने शाक्यांपासून प्रव्रज्या घेतली आहे तो गौतम अंगुत्तरापामध्ये, मोठ्या भिक्षुसंघासोवत तीनशे भिक्षूंचा समुदाय घेऊन फ़िरत असताना आपण येथे येऊन पोचला आहे. ह्या श्रमण गौतमाची अशी शुभ कीर्ती पसरली आहे की, हा भगवान् अर्हत आहे.... (वरीलप्रमाणे) देवमनुष्यांचा गुरू, भगवान बुद्ध आहे. त्याला मी उद्या सकाळी भिक्षुसङ्घासोवत आमंत्रण केले आहे."

"हे केणिया, आपण बुद्ध असे म्हणता?"

"हे शैला, मी बुद्ध असे म्हणतो."

"हे केणिया, आपण बुद्ध असे म्हणता?"

"हे शैला, मी बुद्ध असे म्हणतो."

३. मग त्या ब्राह्मण शैलाला असे वाटले, " 'बुद्ध' हा शब्दही ह्या लोकात दुर्लभ आहे. पण आमच्या मंत्रांमध्ये महापुरुषाची वत्तीस लक्षणे परंपरेने आली आहेत. ह्या लक्षणांनी युक्त असलेल्या महापुरुषाच्या दोनच गती संभवतात; तिसरी संभवत नाही. तो जर प्रपंचात राहिला तर तो चक्रवर्ती राजा होतो, धर्मराज होतो, समग्र पृथ्वीचा तो अधिपती होतो, सर्व जनपदांत तो स्थैर्य प्रस्थापित करतो; आणि सात कोषांचा तो धनी असतो – चक्रकोप, हस्तिकोप, अश्वकोष, मणिकोप, स्त्रीकोप, गृहपतिकोप आणि सातवा मन्त्रीकोप. शूर, वीरोचित शरीराचे, शत्रूच्या सैन्याचे मर्दन करणारे असे त्याचे सहस्राहून अधिक पुत्र असतात. समुद्रांपर्यंतच्या ह्या पृथ्वीवर विजय मिळवून तो तिच्यावर धर्माने राज्य करतो, दण्डशक्तीने नव्हे, शस्त्राने नव्हे. पण त्याने गृहापासून प्रव्रज्या घेतली आणि अनिकेत स्थितीत राहू लागला तर तो अर्हत होतो, सम्यक्









सम्बोधी त्याला प्राप्त होते, तो जगावरील आवरण काढून टाकतो."

(मग शैल केणियाला विचारतो) "श्रीमान केणिया, अर्हत्, सम्यक् संवोधी प्राप्त झालेला पूज्य गौतम सध्या कुठे राहात आहे?"

त्याने असे विचारल्यावर त्या जटाधारी केणियाने आपला उजवा बाहू लांब करून त्याला सांगितले, "हे शैला, त्या निळ्या वनराजीपाशी तो राहात आहे."

मग तो ब्राह्मण शैल तीनशे ब्राह्मण तरुणांसमवेत भगवंतांपाशी गेला. मग त्या ब्राह्मण शैलाने त्या ब्राह्मण तरुणांना उद्देशून म्हटले, "आपण शब्द न करता, (जपून) पावले टाकीत यावे. एकट्यानेच विहार करणाऱ्या सिंहाकडे जाण्याप्रमाणे ह्या भगवंतांजवळ जाणे दुःसाध्य असते. तेव्हा जर मी श्रमण गौतमासोवत संभाषण केले तर त्यात व्यत्यय आणू नका; आमचे संभाषण पुरे होईपर्यंत आपण थांबा."

मग तो शैल ब्राह्मण भगवंतांपाशी गेला; त्यांच्यापाशी गेल्यावर त्यांना त्यांचे कुशल त्याने विचारले. त्यांच्याशी सौहार्दाने व आदराने वोलल्यानंतर तो एका वाजूला मर्यादेने अंतर राखून वसला. अशा रीतीने, आदराने अंतर राखून तो एका वाजूला वसला असताना, तो भगवंतांच्या शरीरावर महापुरुषाची वत्तीस लक्षणे निरखून पाहू लागला. तो ब्राह्मण शैल भगवंतांच्या शरीरावरची वत्तीस महापुरुप लक्षणे निरखून पाहात असताना त्याला दोन वगळून वाकी सर्व लक्षणे तेथे दिसली. महापुरुपाची ही दोन लक्षणे (भगवंतांच्या शरीरावर) आहेत की नाहीत याविपयी त्याला शंका आली. तो गोंधळला, त्यांच्याविपयी त्याची निश्चिती होईना, त्याचे समाधान झाले नाही – जे वस्त्राने झाकलेले असते त्याला कोपाचे आवरण आहे की नाही आणि जीभ लांब आहे की नाही (अशी शंका त्याला होती). मग भगवंतांच्या मनात विचार आला, "ह्या शैल ब्राह्मणाला माझ्या शरीरावरची दोन वगळता वाकी सर्व, तीस महापुरुप-लक्षणे दिसतात. महापुरुपाच्या ह्या दोन लक्षणांविपयी त्याला शंका आहे, तो गोंधळला आहे, अनिश्चित आणि असमाधानी आहे. जे वस्त्राने झाकलेले आहे त्याच्यावर कोपाचे आवरण आहे का? आणि माझी जीभ लांब आहे का? मग भगवंतांनी त्या ब्राह्मण शैलाला अशी अतींद्रिय शक्ती दिली की, भगवंतांनी जे वस्त्राने झाकले होते त्याच्यावर कोपाचे आवरण होते हे त्याने पाहिले. मग भगवंतांनी आपली जीभ वाहेर काढली आणि तिने आपल्या दोन्ही कानांना मागे व पुढे थोपटले, आपल्या नाकपुड्यांवर मागे व पुढे आघात केले आणि आपले सवंध कपाळ तिने झाकले. मग त्या शैल ब्राह्मणाच्या मनात असा विचार आला, "ह्या श्रमण गौतमाच्या अंगी महापुरुपाची सर्व वत्तीस लक्षणे आहेत; त्यांतील केवळ कित्येकच आहेत असे नाही. पण तो वुद्ध आहे की नाही हे मला अजून कळलेले नाही. तथापि वयोवृद्ध, आचार्यांचे आचार्य असलेल्या श्रेष्ठ ब्राह्मणांना असे म्हणताना मी ऐकले आहे की, जे अर्हत् आहेत, सम्मासम्वुद्ध आहेत त्यांची जेव्हा स्तुती करण्यात येते तेव्हा ते स्वतःला प्रकट करतात.[२] समजा, मी श्रमण गौतमासमोर राहून उचित गाथांनी त्याची स्तुती केली तर?"

४. मग त्या शैल ब्राह्मणाने भगवंतांसमोर उभे राहून त्यांची उचित गाथांनी स्तुती केली :

**शैल** – "परिपूर्ण[३] आहे आपली काया, तेजस्वी,
प्रमाणवद्ध[४], सुरेख दिसणारी
भगवंत, आपली कांती सुवर्णाची आहे, दात चमकदार
आहेत, वीरोचित शरीर आहे आपले.
पुरुपाच्या प्रमाणावद्ध शरीरावर जी सूचक चिन्हे असतात
ती सर्व महापुरुषलक्षणे आपल्या कायेवर आहेत!
आपण प्रसन्ननेत्र, सुमुख, प्रमाणवद्ध[५], सरल, कान्तिमान्
आहात.
भिक्षुसंघामध्ये सूर्यासारखे आपण विराजता.
सुवर्णासारख्या कांतीच्या भिक्षूचे दर्शन शुभ असते.
पण अशा उत्तम कांतीचे भिक्षूला काय प्रयोजन असेल?
आपण राजा म्हणून शोभून दिसाल, चक्रवर्ती, श्रेष्ठ रथी,
सर्व जगाचा विजेता, जम्वुद्वीपाचा[६] सत्ताधीश.
क्षत्रिय आणि श्रीमंत राजे आपले सामन्त व्हावेत.
गौतमा! आपण राजाधिराज, मानवांचे अधिपती आहात,
आपण राज्य करावे."

**गौतम** – "मी राजा आहे, शैला, धर्मराज, सर्वश्रेष्ठ.
मी धर्मचक्राला गती देतो, ते उलट फिरविता येत नाही.

**शैल** – "आपण सम्वुद्ध आहोत अशी आपली प्रतिज्ञा
आहे, सर्वश्रेष्ठ धर्मराज आपण आहोत,
आपण धर्मचक्राला गती देतो असे आपण म्हणता
मग आपला सेनापती कोण आहे





आणि आपल्यानंतर येणारा आपला कोण शिष्य आहे,
जो आपण प्रवर्तित केलेल्या धर्मचक्राला गती देत राहील?"

**गौतम** – "मी प्रवर्तित केलेल्या सर्वश्रेष्ठ धर्मचक्राला, शैला,
सारिपुत्र गती देईल. तो तथागताचा वारस आहे.
ज्याचे ज्ञान करून घ्यायचे असते त्याचे ज्ञान मी मिळविले आहे;
जे विकसित करायचे असते ते मी विकसित केले आहे.
जे स्वतःहून अव्हेरायचे असते ते मी अव्हेरले आहे –
म्हणून, हे ब्राह्मण, मी बुद्ध आहे!
माझ्याविषयीची आशंका दूर कर, ब्राह्मणा,
माझ्यावर श्रद्धा ठेव.
"सम्बुद्धांचे दर्शन दुर्लभ असते ह्या लोकात,
तसा मी सम्बुद्ध आहे, ब्राह्मणा,
सर्वश्रेष्ठ भिषक्[७] आहे. मी ब्रह्मीभूत आहे, अतुलनीय असा,
माराच्या सैन्याची दाणादाण करणारा
सर्व शत्रूंचा पाडाव करून मी प्रमुदित आहे,
मला कुठूनही भय नाही."

**शैल** (आपल्या शिष्यांना उद्देशून) : "ऐकावे हे आपण सर्वांनी,
हा चक्षुमान जे बोलत आहे,
वनातल्या सिहांप्रमाणे गर्जून तो सांगत आहे,
'मी श्रेष्ठ भिषक् आहे, महावीर,
अतुलनीय असा ब्रह्मीभूत,
माराच्या सेनेचे मर्दन करणारा,
कोण ह्याच्यावर श्रद्धा ठेवणार नाही,
अगदी कृष्णवर्णी, नीच जातीचा माणूसही ठेवील.
ज्याची इच्छा असेल त्याने माझ्यामागून यावे,
ज्याची इच्छा नसेल त्याचे निघावे येथून –
पण मी ह्या श्रेष्ठ प्रज्ञावंतापाशी प्रव्रज्या घेईन.' "

**ब्राह्मणसमुदाय** – "आचार्य, ह्या सम्मासम्बुद्धाची शिकवण
जर आपल्याला रुचली असेल
तर ह्या श्रेष्ठ प्रज्ञावंतापाशी आम्हीही प्रव्रज्या घेऊ."

**शैल** (गौतमाला उद्देशून) – "भगवन्! हे तीनशे ब्राह्मण, अभिवादनासाठी हात जोडून,
आपणाजवळ ब्रह्मचर्याचे आचरण करता यावे अशी याचना करीत आहेत."

**गौतम** – "ब्रह्मचर्याच्या मार्गाचे चांगले वितरण झालेले
आहे, शैल," तो स्वतःसिद्ध, अकालिक (चिरंतन) आहे.
स्खलन न पावता जो त्याचे प्रशिक्षण घेतो
त्याची प्रव्रज्या अमोघ (अटळपणे यशस्वी) ठरते.

ब्राह्मण शैल आणि त्याचा शिष्यवृंद यांना भगवंतांकडून प्रव्रज्या लाभली, त्यांना भिक्षूपदाची दीक्षा लाभली.

५. मग रात्रीचा प्रहर संपत आला असताना जटाधारी केणियाने आपल्या आश्रमात घन आणि मृदू मिष्टान्ने सिद्ध केली आणि भगवंतांना (भोजनाची) वेळ झाली आहे असे सांगितले. तो म्हणाला, "आदरणीय गौतमा, (भोजनाची) वेळ झाली आहे, स्वयंपाक सिद्ध आहे." मग भगवंतांनी सकाळच्या प्रहरी वेष परिधान केला, कमण्डलू आणि चीवर हातात घेतले आणि ते जटाधारी केणियाच्या आश्रमापाशी आले; आश्रमापाशी आल्यावर आपल्यासाठी मांडलेल्या आसनावर ते बसले आणि भिक्षुसंघही आपापल्या आसनावर बसला. मग जटाधारी केणियाने भिक्षुसंघाला आणि त्याचा प्रमुख असलेल्या बुद्धाला आपल्या हाताने घन आणि मृदू मिष्टान्ने वाढली आणि त्यांना तृप्त केले. भगवंतांचे भोजन होऊन त्यांनी कमण्डलूतून हात मागे घेतल्यावर तो जटाधारी केणिया भगवंतांपासून मर्यादेने अंतर राखून, एका खालच्या आसनावर बसला. जटाधारी केणिया असा मर्यादेने अंतर राखून एका बाजूला बसला असताना भगवंतांनी त्याला ही गाथा ऐकविली.

*अग्नीच्या पूजेच्या प्रकारांत यज्ञ प्रमुख आहे;*
*वेदातील छंदांत सावित्री प्रमुख आहे;*
*राजा मनुष्यांचा प्रमुख आहे;*
*समुद्र नद्यांचा प्रमुख आहे.*
*चंद्र नक्षत्रांचा प्रमुख आहे,*
*सूर्य दीप्तिमंतांचा प्रमुख आहे,*
*पुण्याची आकांक्षा धरून दान करणाऱ्यांचा*
*संघ हा प्रमुख आहे.*

मग जटाधारी केणियाचे ह्या गाथेने आभार मानून भगवंत आसनावरून उठले व तेथून निघाले.

अनुक्रमणिका

६. मग आयुष्मान शैल आणि त्याचा शिष्यवृन्द एकांतात, जनापासून दूर असे राहिले, स्खलन न पावता, दृढपणे, निर्धाराने त्यांनी (ब्रह्मचर्याचे पालन केले) आणि लवकरच त्यांना, येथे आणि आताच, सम्यक् दृष्टी प्राप्त झाली आणि तिच्या बळावर, ज्यासाठी सत्कुलातील तरुण आपल्या घरादाराचा त्याग करून अनिकेत अवस्थेला नेणारी प्रव्रज्या घेतात – आणि ते योग्य तेच करतात – आणि तिच्यात स्थिर राहतात, ते ब्रह्मचर्याचे सर्वश्रेष्ठ फळ त्यांना लाभले. आणि त्यांना हे ज्ञान झाले की, 'जन्म(मरणा)चा नाश झाला आहे, ब्रह्मचर्य सफल झाले आहे, जे करण्याजोगे होते ते करण्यात आले आहे, यापुढे इहलोकीची (प्रतीत्यसमुत्पादाची) अवस्था नाही.' आणि आयुष्मान् शैल आणि त्याचा शिष्यवृन्द अर्हत् झाले. मग आयुष्मान् शैल आणि त्याचा शिष्यवृन्द भगवंतांकडे गेले. तेथे गेल्यावर शैलाने आपले चीवर एका खांद्यावर घेतले, हात जोडून भगवंतांना नमन केले आणि त्याने भगवंतांना उद्देशून ही गाथा म्हटली :

*हे चक्षुमत्, आठ दिवसांपूर्वी आम्ही आपल्याला शरणस्थान केले,*
*भगवन्, आपल्या श्रेष्ठ शिकवणीमुळे सात दिवसांत आम्ही दान्त झालो.*
*आपण बुद्ध आहात, गुरू, माराचे विजेते मुनी आहात.*
*संस्कारांना छेदून आपण (भवसागर) उत्तीर्ण केला*
*आणि प्रजेला तरून जायला साहाय्य करता.*
*(पुनर्जन्माची बीजे असलेल्या) उपाधी आपण ओलांडल्या आहेत,*
*आसवांचा चुराडा आपण केला आहात,*
*आसक्तीपासून, भयत्रासापासून मुक्त असे सिंह आपण आहा,*
*तीनशे भिक्षूंचा संघ हात जोडून आपल्यापुढे उभा आहे.*
*हे वीरा! आपण पाय पुढे करावे; नागदेवतांना[८] गुरूला वंदन करूद्या.*

टीपा :

१. लोकायत : ह्याचा चार्वाकप्रणीत लोकायत दर्शनाशी संबंध दिसत नाही. ह्या शब्दावर *पालि-इंग्लिश डिक्शनरी* - व्हिस डेव्हिड्स अँड स्टीड, पालि टेक्स्ट सोसायटी ह्यात दिलेली टीप अशी : जगाविषयीची नेहमीची दृष्टी, सर्वसामान्य किंवा लोकांत रूढ असलेले तत्त्वज्ञान. किंवा व्हिस डेव्हिड्स यांनी म्हटल्याप्रमाणे (*Dialogues of Buddha*, 1.171) "ब्राह्मणांच्या विद्येची एक शाखा, बहुधा निसर्गाविषयी विद्या (*Nature-love*); कालांतराने हिचा, शब्दच्छलावर आधारलेल्या तर्काभासात्मक युक्तिवादांचा संग्रह करणाऱ्या कु-दर्शनात (किंवा दर्शनकल्पात) विकास झाला," ["name of a branch of Brahman learning, probably *Nature-love*; later worked into a quasi system of casuistry or sophistry'.]

२. बुद्धाच्या स्वतःच्या म्हणण्याप्रमाणे मूर्ख माणूस असे करतो; अर्हत् असे वागत नाहीत.

३. सर्व बत्तीस लक्षणांनी युक्त.

४. मुळात 'सुजात'; ज्याची जन्मजात काया उत्कृष्ट आहे; म्हणजे उंची व रुंदी यांत योग्य प्रमाण आहे, व म्हणून जिचा आकार चांगला आहे.

५. मुळात 'ब्रह्म'. हे विशेषणसुद्धा दोन्ही बाहू पसरले असता रुंदी आणि उंची ह्यातील प्रमाणबद्धतेचा निर्देश करते.

६. मुळात 'जम्बुसण्ड' – म्हणजे जम्बुद्वीप किंवा भारत. चक्रवर्ती राजा हा केवळ जम्बुद्वीपांचा नव्हे तर सर्व चार खंडांचा किंवा द्वीपांचा राजा असतो अशी बौद्ध समजूत आहे.

७. मुळात 'सल्लकत्त' (शल्यकर्तृ) – बाणाने केलेली जखम बरी करणारा शल्यवैद्य.

८. नाग किंवा नागदेवतांना बौद्ध वाङ्मयात, पुराणकथांत मोठे स्थान आहे. त्यांच्या ठिकाणी अतींद्रिय सामर्थ्य असते अशी समजूत आहे.



# अक्षरवेध

**व्यक्ती आणि प्रकृती** - स.ह. देशपांडे; मॅजेस्टिक प्रकाशन, पुणे, १९९८; रु. १२०.००.

प्रा. स.ह. देशपांडे यांचे नवे पुस्तक *व्यक्ती आणि प्रकृती* हे त्यांच्या ललित लेखनकौशल्याचा प्रत्यय देणारे आणि म्हणूनच अतिशय वाचनीय वाटले. यात सर्व व्यक्तिचित्रेच आहेत, आणि वरीचशी अशांची आहेत की ज्यांच्यावद्दल पुष्कळांना कुतूहल वाटते. उदाहरणार्थ, प्रा. श्री.म. माटे, डॉ. पु.ग. सहस्रबुद्धे, श्री. रॉय किणीकर, प्रा. गंगाधर गाडगीळ, श्री. विद्याधर पुंडलिक, श्री. विजय तेंडुलकर, श्री. व्ही.जी. कानेटकर, प्रा. ना.ग. नारळकर, म्हैसाळ प्रकल्पाचे देवल वगैरे. वाकीची व्यक्तिचित्रे अप्रसिद्धांची असली तरी ती अप्रसिद्ध माणसेदेखील आपापल्या-परीने वैशिष्ट्यपूर्ण असल्याने पुस्तक चाळता चाळता केव्हा संपले हे वाचकाच्या लक्षातही येत नाही. अर्थशास्त्रासारख्या एकूण रूक्ष विपयाच्या संगतीत राहूनही स.ह. निश्चितच चटकदार लिहू शकतात!

पुस्तकांतली काही व्यक्तिचित्रे १९८६ सालातली तर काही थेट १९९८ इतकी अलिकडची आहेत.

देशपांडे प्रत्येक व्यक्तिमत्त्वाचा चिकित्सक वेध घेतात आणि त्यानंतर जे काही त्यांचे विचारपूर्वक मत बनले असेल ते निःसंकोचपणे मांडतात. चपखल शव्दांचा उपयोग करून वास्तविकतः व्यक्त करायला अवघड अशा भावभावना व सूक्ष्म तपशील ते सतत देत राहतात.जे परखड मतप्रदर्शन ते करतात ते सामान्यतः सर्व वाचकांना पटण्यासारखे असते. पण याला अपवाद होतो तो जेव्हा त्यांची गाडी रा.स्व. संघ किंवा सावरकरवादाच्या रुळांवरून जात असते तेव्हा. हिंदुत्ववादाचा त्यांचा अभिनिवेश सोडला तर स.ह. हे सर्व पुरोगाम्यांना तसे जवळचे आहेतच. आणि ज्या मुस्लिम प्रश्नाने ते अनेकदा इतके वेचैन होतात तो सुद्धा वराचसा अतिरंजित वाटतो. अन्याय्य व असह्य ब्राह्मणी वर्चस्वाला कंटाळूनच तर आजचे मुसलमान हिंदुधर्म सोडून गेले होते आणि प्रयत्नांची पराकाष्ठा अनेक वर्षे केल्यानंतरच, डॉ. आंवेडकरही हिंदुधर्मातून वाहेर पडून वुद्धधर्मात गेले. हे स.हं.नादेखील मान्य व्हावे. शिवाय समतावादी, विज्ञाननिष्ठ, आधुनिक, पुरोगामी हिंदुत्वाचा जो आदर्श देशपांडे उराशी धरतात तो एकूण हिंदुत्ववाद्यांपैकी कितीजण मानतात? मला वाटते, ही एक अत्यल्पसंख्यक जमात आहे. मात्र 'उलटा चोर कुतवालको डांटे' या हिंदी वाक्प्रचाराची आठवण करून देणारे प्रा. देशपांड्यांचे प्रतिपादन पान १५७ वर येते : "पण एक मूलभूत अंधश्रद्धा त्यांनी निकरानं प्राणपणानं जोपासली आहे असं मला नेहमी वाटत आलं आहे. तो म्हणजे मुस्लिम प्रश्न असा काही अस्तित्वात नाही. किंवा असलाच थोडाफार तर तो 'जातीयवादी' हिंदूंनी निर्माण केला आहे. या एका वावतीत इतिहास, वास्तव चिकित्सा, वुद्धिवाद इत्यादी गोष्टी त्यांना सोडून परागंदा होतात."

पण हे एक न संपणारे भांडण आहे. पन्नास वर्षांपूर्वीच्या साप्ताहिक *जनसत्ता*च्या संचिका चाळताना कै. शंकरराव मोरे यांनी संघवंधूंच्या भूमिकेचे काढलेले वाभाडे वाचताना असे वाटते की, काँग्रेसवाल्यांच्या करंट्या राजकारणामुळेच आज हे लोक कधी नव्हे इतकी आक्रमक भाषा करायला सरसावले आहेत. कालाय तस्मै नमः।

*विश्वास नाईकनवरे*

❖❖

**बखर एका डॉक्टराची** – अनिरुद्ध फडके; श्रीविद्या प्रकाशन, पुणे, १९९९; किं. रु. १८०/-.

हा डॉ. अनिरुद्ध फडके ह्यांच्या ४३ छोट्या छोट्या लेखांचा संग्रह. 'दैनंदिन जीवनातील अनुभव, जगभरच्या घडामोडी यांचा विचार वैद्यकशास्त्र, वैद्यकाचा इतिहास व वैद्यकीय नीतिमूल्ये ह्यांच्या अनुषंगाने' करणारे हे लेख आहेत. तसेच 'वैद्यकीय जगत व समाज यांच्यातील परस्परसंवंधांचे निरनिराळे पैलू या लेखांतून आपल्यासमोर येतात' असा ह्या पुस्तकाचा








अनुक्रमणिका

परिचय ह्या पुस्तकातच प्रकाशकांतर्फे करून देण्यात आला आहे. तो सार्थ असल्याचा प्रत्यय हे लेख वाचल्यानंतर येतो.

डॉ. फडके ह्यांचे लेख छोटे असले तरी मार्मिक आहेत. एक वैद्यकीय व्यावसायिक ह्या नात्याने आणि वैद्यकीय दृष्टिकोनातून अनेक विषयांसंबंधीचे आपले निरीक्षण आणि निष्कर्ष त्यांनी प्रांजळपणे मांडलेले आहेत. प्रत्येक व्यवसायाची एक चाकोरी असते आणि ती त्या त्या व्यवसायातले लोक कळत-नकळत निर्माण करीत असतात. त्या चाकोरीच्या सीमारेषांमध्ये ते हळूहळू बंदिस्त होत जातात, आणि हा बंदिस्तपणा अनेकांना आवडूही लागतो. वैद्यकीय शिक्षण घेत असताना अशा बंदिस्तपणाचा एक प्रत्यय विद्यार्थ्यांना येतो, तो त्यांच्या शिक्षकांकडूनच. वैद्यकीय पाठ्यपुस्तकांव्यतिरिक्त माहितीच्या इतर स्रोतांकडे वळणारे विद्यार्थी जेव्हा *लॅन्सेट*, *ब्रिटिश मेडिकल जर्नल* सारखी नामवंत वैद्यकीय नियतकालिके वाचू लागतात तेव्हा, आणि रुग्णांशी प्रत्यक्ष संबंध आल्यानंतरही त्यांना वैद्यकातल्या अनिश्चिततेची कल्पना येते. ठरावीक पाठ्यपुस्तके आणि आपले ज्येष्ठ शिक्षक जे अंतिम सत्य असल्यासारखे सांगत असतात ते सर्वच खरे नसते, ह्याचा प्रत्यय विद्यार्थ्यांना येऊ लागतो. परंतु शिक्षकांच्या विधानांबद्दल कोणी प्रत्यक्षाप्रत्यक्षपणे शंका व्यक्त केली, की शिक्षक नाराज होतात. 'माझा वीस वर्षांचा अनुभव आहे; पुस्तकांत, नियतकालिकांत काहीही छापतात' असे काहीतरी म्हणून ही नाराजी व्यक्त केली जाते ('माहिती अडवा, माहिती जिरवा'). खरे म्हणजे वीस वर्षांचा अनुभव ही वीस वर्षांची चाकोरीही असू शकते. अशा चाकोरीबाहेर नजर फेकायची तर एक सर्वस्पर्शी कुतूहल असावे लागते, आणि ते डॉ. फडके ह्यांच्याकडे आहे. एरव्ही शिवाजीमहाराजांना 'गुडघी रोग' झाल्यामुळे ते मरण पावले, हे लोक वर्षानुवर्षे ऐकत-वाचत असताना, हा गुडघी रोग म्हणजे नेमके काय होते, आधुनिक वैद्यकाच्या चष्म्यातून पाहिले असता महाराजांच्या अखेरच्या आजाराचे निदान काय करता येईल, ह्या प्रश्नांचा पाठपुरावा डॉक्टरांनी केला नसता. पण त्यांनी शिवाजीमहाराजांवर लिहिलेली अनेक पुस्तके पाहिली; त्यांत महाराजांच्या ह्या आजारपणाची दिलेली वर्णने वाचली आणि महाराजांचा हा रोग म्हणजे 'अल्सरेटिव्ह कोलायटीस' असला पाहिजे असे निदान केले आहे. असे निदान करण्यामागची कारणेही त्यांनी स्पष्ट केली आहेत ('शिवरायांचा आठवावा आजार'). महाराज ज्या काळात जगले तो बराच मागे पडला आहे आणि वैद्यक बरेच पुढे गेले आहे. पण त्यामुळे, आजचे उपचार त्या काळी करणे शक्य असते, तर महाराज नक्की वाचले असते, ही जाणीव आपल्याला व्यथित करते. राजयक्ष्मा (क्षय) झाल्यामुळे आणि त्यावरील आधुनिक उपचार उपलब्ध नसल्यामुळे थोरल्या माधवरावां-सारख्या कर्तृत्ववान पेशव्यांच्या अकाली निधनाचेही आपल्याला स्मरण होते. परंतु शिवाजीमहाराज काय, किंवा थोरले माधवराव पेशवे काय, आजचे आधुनिक उपचार त्यांना उपलब्धच नव्हते. पण आज ते उपलब्ध असले, तरी सर्वांना त्यांचा लाभ मिळत नाहीच. आणि जोवर विकासाची, प्रगतीची फळे समाजाच्या सर्व थरांपर्यंत पोचत नाहीत तोवर त्याला खऱ्या अर्थाने विकास म्हणता येणार नाही. भारतासारख्या देशात जिथे राष्ट्रीय उत्पन्नातील पाच टक्क्यांहूनही कमी भाग वैद्यकीय सेवांसाठी खर्च होतो — तिथे वैद्यकशास्त्रातील प्रगत तंत्रज्ञानाचा फायदा सर्वांना मिळायचा असेल, तर त्याचा खर्च कुणी करायचा हा प्रश्न उपस्थित केला जातो. वस्तुतः एअर इंडिया, स्टील ॲथॉरिटी ऑफ इंडिया अशा कंपन्यांचा हजारो कोटींचा तोटा सरकार सोसते; मग गोरगरिबांचा जीव वाचवण्यासाठी सरकारकडे पैसे का असू नयेत? ('नोबेलविजेते अमर्त्य सेन आणि वैद्यकसेवेची टायटॅनिक'). पण सरकारी स्वास्थ्यसेवा फुकट असू नये असा विचार येथे उत्साहाने मांडला जातो, आणि सरकारी रुग्णसेवा त्या दर्जाची व कमी खर्चाची होण्यासाठी अवास्तव उपाय सुचवले जातात. औषधे आणि वैद्यकीय शिक्षण उपकरणे वैद्यकीय संस्थांनी स्वतः बनवावी ही एक अशीच सूचना, वैद्यकीय शिक्षणाचा खर्च कमी करण्यासाठी केली जाते, तीही वास्तवाचा विचार वाऱ्यावर सोडून. ज्या गोरगरिबांना वैद्यकीय सेवा – आज जशी आहे तशी – विनामूल्य मिळते, त्यांना 'फुकटे' म्हणणे डॉक्टर फडके ह्यांना योग्य वाटत नाही. कोट्यवधी गरिबांना स्वखर्चाने वैद्यकीय सेवा मिळविण्याइतकी ऐपतच नाही, ही परिस्थिती आहे. पण महापालिकेच्या किंवा सरकारी इस्पितळात कुणातरी महत्त्वाच्या व्यक्तीची चिठ्ठी घेऊन काहीजण येतात आणि त्या अतिमहत्त्वाच्या व्यक्ती ठरतात. ह्या व्यक्ती वा त्यांचे नातेवाईक प्रामाणिकपणे उपचार करणाऱ्या डॉक्टरांना अनेकदा आपल्या तऱ्हेवाईक वागण्याने अडचणीत आणतात. ('आम्ही कोण म्हणुनि काय पुसता....?')








वैद्यकाचे शिक्षण घेत असतानाच्या काळातले, तसेच प्रत्यक्ष वैद्यकीय व्यवसायातले अनेक बोलके अनुभव डॉक्टर फडके ह्यांनी निरनिराळ्या लेखांतून सांगितले आहेत. वैद्यकीय अभ्यासक्रमाचा प्रचंड आवाका, अपुरा वेळ, पालकांच्या, निकटवर्तीयांच्या विद्यार्थ्यांकडून असलेल्या अपेक्षा, शैक्षणिक यशापयशाच्या विचाराने विद्यार्थ्यांच्या मनांवर येणारा असह्य ताण, वैद्यकीय अभ्यासक्रमातली जीवघेणी स्पर्धा अशा अनेक कारणांमुळे वैद्यकीय शिक्षण घेणाऱ्यांपैकी एखाद्या विद्यार्थ्याच्या/विद्यार्थिनीच्या आत्महत्येची घटना दर वर्षी घडत असते ('अमरावतीतल्या आत्महत्या'). एम्.डी., एम्.एस्. करणाऱ्या विद्यार्थ्याला अक्षरशः वेठबिगारासारखे राबावे लागते. सततचे काम, तेही अत्यंत जबाबदारीचे, तुटपुंजा पगार, राहण्याची सोय गर्दीतली, अशा अवस्थेत तीन वर्षे त्याला काढावी लागतात. डॉक्टरांची ड्यूटी ही सलग बत्तीस ताससुद्धा असू शकते ('धनुर्वात पर्व'). वैद्यकीय व्यवसायात रुग्णांचे आप्त त्यांच्याबरोबर येतात. त्यांचे अनुभवही वेगळे आणि विलक्षण असतात. कोट्याधिश असामी मरणपंथाला लागल्यासारखे वाटताच त्याचे सगेसोयरे त्याला मृत्युपत्र करण्याइतकी शुद्ध कशी येईल ह्याची चौकशी करत राहतात, पण त्याची प्रकृती कशी आहे, त्याला औषधे बदलून दिली जाताहेत का, असली कसलीच चौकशी करीत नाहीत! ह्याउलट भावाची शुश्रूषा करण्यासाठी स्वतःच्या नोकरीवर पाणी सोडणारा भाऊही कधीकधी भेटतो. खेड्यातले लोकसुद्धा डॉक्टरांना त्वरित हवी असलेली रुग्णाची माहिती स्वतः तयार ठेवतात आणि डॉक्टरांना सहकार्य करतात ('सगे सोयरे').

वैद्यकीय क्षेत्रात आपल्या संशोधनाने, सेवाभावी वृत्तीने ज्यांनी लौकिक मिळवला आणि कधी मरणही मिळवले, अशा काही डॉक्टरांविषयी डॉक्टर फडके ह्यांनी आदरपूर्वक लिहिले आहे ('डॉ. नॉर्मन बेथूनकी अमर कहानी', 'एक होता ऑस्लर', 'रूडॉल्फ फर्को'). जपानने चीनवर आक्रमण केले त्या काळात चीनच्या विनंतीवरून डॉ. बेथून हे चीनला गेले. तिथे जखमी सैनिकांची त्यांनी सेवा केली, अत्यंत अडचणीत शस्त्रक्रिया केल्या, प्रसंगी स्वतःचे प्राण संकटात घातले; आणि अखेरीस रबरी हातमोज्यांशिवाय शस्त्रक्रिया करताना बोटांना इजा होऊन जंतुसंसर्ग झाल्याने ते मरण पावले. त्यांच्या निधनानंतर डॉ. कोटणीसांनी त्यांची जागा घेतली. रुग्णाला वैद्यकीय शिक्षणाचा केंद्रबिंदू मानून वैद्यकाचे अध्यापन करणारे डॉ. ऑस्लर ह्यांचे जीवनही मूळ लेखातून वाचण्यासारखे आहे. आपल्याकडला प्राचीन कालातला थोर वैद्य सुश्रुत ह्याच्याबद्दलही त्यांनी सविस्तर लिहिले आहे ('सुश्रुत').

वैद्यकीय व्यवसायातील आणि संशोधनातील काही अपप्रवृत्तींबद्दलही त्यांनी लिहिले आहे. ('वैद्यकशास्त्रातील नाना कला आणि कळा', 'बेगे बेगे धावू', 'नाझी वैद्यक', 'इतिहासाचे अवजड ओझे', 'नाही तर इतिहासाची पुनरावृत्ती होतच राहील'). अणुबाँबचा स्फोट झाल्यानंतर होणाऱ्या किरणोत्सर्गाचे मानवी शरीरावर तावडतोब आणि अनेक वर्षांपर्यंत काय परिणाम होतील ह्याचे संशोधन करण्यासाठी सुमारे वीस हजार स्त्री-पुरुषांवर, त्यांच्या नकळत, त्यांच्या संमतीविना अमेरिकेत प्रयोग करण्यात आले. नाझींच्या छावण्या आणि त्यांनी केलेला नरसंहार ह्यांत वैद्यकीय व्यावसायिकांनी कसा भाग घेतला होता ह्याच्या हकीगती त्यांनी सांगितल्या आहेत. त्यात ज्यू असल्यामुळे 'जगण्यास नालायक' ठरलेल्यांवर वाटेल ते वैद्यकीय प्रयोग करण्याची मुभा हिटलरच्या राजवटीने डॉक्टरांना दिली होती. ह्यांत अनेक नामवंत डॉक्टरांनी प्रयोग केले. पण वर म्हटलेले जे प्रयोग अमेरिकेत केले गेले त्यांच्यामागचे समर्थन काय होते, तर प्रयोगार्थ निवडलेली माणसे दहा वर्षांवर जगणार नाहीत अशा अवस्थेत होती हे! प्रत्यक्षात ह्यांतील बरेच लोक दहा वर्षांच्या वर जगले. पण अमेरिकन डॉक्टरांची मनोवृत्ती आणि जर्मनीतल्या नाझी डॉक्टरांची मनोवृत्ती ह्यांत मूलभूत फरक काय? असा प्रश्न कोणाच्याही मनात आल्यावाचून राहणार नाही.

'दधीची आणि आधुनिक विज्ञान' सारखे काही लेख देहदानासारख्या आपल्या काही कल्पना वस्तुस्थितीच्या संदर्भात आपण तपासून घ्याव्या म्हणून लिहिलेले आहेत. मरणोत्तर देहदान करावे असे काहींना वाटत असते. वैद्यकीय विद्यार्थ्यांना शवविच्छेदनासाठी आपला देह उपलब्ध व्हावा, आपण ज्या रोगाने मरण पावणार त्या रोगावरील उपचारात प्रगती करण्यासाठी आपला देह उपयोगी पडेल, आपल्या अवयवांचा प्रत्यारोपणासाठी उपयोग होईल असे तीन प्रकारचे हेतू साधारणतः देहदानामागे असतात. पण आता मानवी देहाची अंतर्गत रचना पूर्णपणे उलगडलेली आहे. शिवाय ह्या अंतर्गत रचनेची उत्तम चित्रे, प्लास्टर ऑफ पॅरिसच्या प्रतिकृती, अवयवांच्या विच्छेदनाचे नमुनेही प्रत्येक वैद्यकीय महाविद्यालयात आहेत. ह्यांखेरीज संगणक, क्ष-किरण तपासणी, सोनोग्राफी, सीटी









अनुक्रमणिका

स्कॅन इ. अत्याधुनिक तंत्र आहेत. मग शवविच्छेदनाच्या अट्टाहासालाच अर्थ उरत नाही. ज्याने कधीच शवविच्छेदन केलेले नाही, अशी व्यक्तीही उत्तम शल्यविशारद होऊ शकते. साऱ्यांचेच अवयव प्रत्यारोपणासाठी घेता येत नाहीत. देहदानामुळे आता वैद्यकीय संशोधनालाही हातभार लागत नाही, असे डॉक्टर फडके ह्यांचे म्हणणे आहे.

अनेकदा आपले काम प्रामाणिकपणे करणारे डॉक्टर झुंडशाहीच्या संकटात सापडतात. डॉक्टरांनी रुग्णावर नीट उपचार केले नाहीत अशा गैरसमजुतीतून हे घडते. रुग्णाच्या जीवन-मरणाशीच डॉक्टरांचा संबंध येत असल्यामुळे हलगर्जी-पणाची शंका – मग ती चुकीची का असेना – येताच डॉक्टर हे लोकांच्या रोषाचे बळी ठरतात. बोरिवलीमध्ये झालेल्या अशा एका घटनेत एका राजकीय पक्षाच्या कार्यकर्त्यांनी एका प्रामाणिक डॉक्टरांवर केलेल्या हल्ल्याचे उदाहरण डॉक्टर फडक्यांनी दिले आहे. ('अम्हास आम्ही पुन्हा पहावे') खंडणी मागणाऱ्याकडूनही डॉक्टरांच्या हत्या केल्या जातात. त्यांना धमक्या दिल्या जातात. इतकेच नव्हे, तर वैद्यकीय सेवा पुरवणाऱ्या परिचारिका आदी कर्मचाऱ्यांचाही छळ होतो. ('डॉक्टर तुम्हीसुद्धा?').

डॉक्टर फडके ह्यांचे अन्य अनेक लेखही वाचनीय आहेत आणि छोट्या छोट्या लेखांतून त्यांनी दिलेली माहिती मोलाची आहे. (उदा. 'बदलत्या रोगविषयक संकल्पना', 'कावीळ आणि तिची मुळाक्षरे', 'खलनायक हूँ मैं', 'शाहिस्तेखानाची बोटे आणि व्हॅन गॉगचा कान', 'हरितात्या आणि पुरावाधिष्ठित वैद्यक'). पश्चिमी जगातला आद्य ग्रीक डॉक्टर हिप्पोक्रेटीस ह्याच्यापासून एकोणिसाव्या शतकापर्यंतच्या नामांकित डॉक्टरांनी तयार केलेल्या आचारसंहितांचा एका लेखात थोडक्यात घेतलेला वेधही प्राचीन काळापासून वैद्यकीय व्यावसायिकांकडून केल्या जाणाऱ्या नैतिक अपेक्षा दाखवून देतो ('हिप्पोक्रेटीसचे पसायदान').

डॉक्टर फडके ह्यांनी हे सर्व लेख सर्वसामान्य सुशिक्षितांसाठी लिहिलेले आहेत. अनेक व्यक्ती औपचारिक अर्थाने सुशिक्षित झाल्या तरी खऱ्या अर्थाने 'सु'शिक्षित वा बहुश्रुत नसतात. त्यांना अनेक क्षेत्रांची, त्यांतील समस्यांची, महत्त्वाच्या घडामोडींची आजच्या जगात असावी तेवढीही माहिती नसते, ही वस्तुस्थिती आहे. इतर माध्यमांबरोबरच नियतकालिके, वर्तमानपत्रांच्या पुरवण्या ह्यांतूनही सुशिक्षितांना खऱ्या अर्थाने सुशिक्षित करणारी अनेक सदरे असतात. ह्यांतून येणाऱ्या लेखांचे वाचन अनेक बाबतींत काही नवी दृष्टी देण्याच्या दृष्टीने उपयुक्त ठरू शकते. डॉक्टरांच्या लेखांचे वाचन वैद्यक आणि वैद्यकीय व्यवसाय ह्यांच्या संदर्भात असे उद्बोधन घडवून आणू शकेल. आपले लेख त्यांनी साध्या, सुलभ भाषेत तर लिहिलेले आहेतच; पण त्यांची शीर्षकेही वाचकांना सहज आपणाकडे बोलावून घेतील अशी दिलेली आहेत. ती त्यांच्या दैनंदिन जीवनाशी जोडलेली आहेत; लोकप्रिय गाणी ('मी कात टाकली', 'किती सांगू मी सांगू कुणाला?', 'खलनायक हूँ मैं), प्राचीन-आधुनिक साहित्यातील लोकांच्या ओठांवर असणाऱ्या काव्यरचनांच्या ओळी ('शिवरायांचा आठवावा....', 'आम्ही कोण म्हणूनि काय पुसता....', 'अम्हास आम्ही पुन्हा पहावे'), लोकप्रिय नाटके ('डॉक्टर तुम्हीसुद्धा?'), ह्यांचा त्यांनी शीर्षकांसाठी उपयोग करून घेतला आहे. डॉक्टर फडके यांच्याप्रमाणेच निरनिराळे व्यावसायिक लोकांशी अशा प्रकारच्या लेखांनी जिवंत संबंध जोडतील तर ती आनंदाचीच बाब ठरेल.

***अ.र. कुलकर्णी***








अनुक्रमणिका





